॥ श्रीनटेश ॥

संगीत

# मर्द मराठा

: लेखक :

गणेश कृष्ण बोडस




बलवन्त पुस्तक भाण्डार
गिरगांव नाका, मुंबई नं. ४.

: प्रकाशक :

**त्र्यंबक विष्णु परचुरे,**
बलवन्त पुस्तक भाण्डार,
गिरगांव नाका,
मुंबई ४.

: मुद्रक :

**शंकर त्र्यंबक आवटे,**
इंदिरा प्रिंटिंग प्रेस,
१००५ सदाशिव पेठ,
पुणें २.





: ब्लॉक्स् :

**मे. गुप्ता ब्रदर्स,**
परळ, मुंबई १२.

**आवृत्ति दुसरी**

: प्रकाशन दिन :
१ जानेवारी १९६०





: मुखपृष्ठ सजावट :

**वसंत विटणकर,**
C/o सी. एम्. विटणकर,
१५९ ललिता निवास,
लेडी जमशेटजी रोड, मुंबई १६.

**किंमत**
**१ रु. ५० न. पै.**



## – विशेष सूचना –



**पत्ता**
श्रीराम मंदिर, सिरी रोड
मुंबई ६.



**गणेश कृष्ण बोडस**
( नाटककार )

# पात्र-परिचय

| | |
|---|---|
| श्रीशिवाजी | महाराष्ट्राचा राजा |
| बाजी घोरपडे | विजापूरचा राजनिष्ठ सरदार |
| सूर्याजी | बाजी घोरपड्याचा मुलगा |
| मालोजी | विजापूरचा मनसबदार |
| रामेश्वर | एक गरीब ब्राह्मण |
| फाजल | मोगल शिपाई |
| करीम | बाटगा मोगल शिपाई |
| मैनावती | बाजी घोरपड्याची मुलगी |
| शेवंती | मालोजीची मुलगी |
| काशीबाई | रामेश्वराची बायको |

( याशिवाय मांग, सेवक, शिपाई इ. )

## प्रस्तावनेदाखल–

प्रत्यक्ष इतिहास आणि ऐतिहासिक नाटक यांत फार अंतर असतें. इतिहासांत तपशिलावर सर्व भर असतो, तर ऐतिहासिक नाटकांत फक्त तत्त्वांशी गांठ असते. ऐतिहासिक सत्याच्या अंगुष्ठमात्र आधारावर, चित्ताकर्षक व भावोद्दीपक नाट्याची द्वारका उभारणें, हें नाटकाचें कार्य असतें, आणि ह्याच धोरणानें मी आजपर्यंतची माझी सर्व नाटकें **–ऐतिहासिक नाटकें–** लिहिली आहेत.

ऐतिहासिक सत्याचा खून न करता आणि तत्कालीन वस्तुस्थितींचा विपर्यास होऊं न देता, प्रेक्षकाच्या व वाचकाच्या मनावर स्वदेश व स्वराज्य याविषयी आत्यंतिक आपुलकीची भावना आणि सद्‌विचार बिंबविण्याचा, आणि त्याचबरोबर त्यांच्या अभिजात सुप्त राष्ट्रीय भावना जागृत करून, त्यांना कार्यक्षम करण्याचा उदात्त हेतु धरून, प्रस्तुत नाटकाची रचना मी केली आहे.

३०० शें वर्षापूर्वी हिंदवी स्वराज्याची स्थापना करतांना, छत्रपति शिवाजी महाराजाना मोगल, विजापूरकर, सिद्दी व फिरंगी अशा चार प्रबल परकीय सत्ताशी झगडतांना, चंद्रराव मोरे किंवा बाजी घोरपडे यांच्या सारख्या स्वकीयाशीही कसें झुजावें लागले आणि राष्ट्रकल्याणासाठी, स्वातंत्र्याच्या रणयज्ञात त्यांची आहुति टाकणे कसें अपरिहार्य होतें, याचें यथातथ्य चित्र रेखाटण्याचा मी यथामति प्रयत्न केला आहे. माझ्या बाकीच्या ऐतिहासिक नाटकांप्रमाणेंच, माझे आवडते महाराष्ट्र रसिक ह्या माझ्या कृतीचेंही यथोचित कोडकौतुक करतील अशी आशा आहे.

१५–१–४९ **—गणेश कृष्ण बोडस**

---

प्रथमावृत्तीतील मुद्रणदोष दुरुस्त करून ही दुसरी आवृत्ति जशीच्या तशी छापली आहे.

—प्रकाशक

श्री नटेश प्रसन्न

संगीत

# मर्द मराठा

## अंक पहिला



### प्रवेश पहिला

[ स्थळः—मुधोळ. बाजी घोरपड्याचा महाल. बाजीची मुलगी **मैनावती** हिंदोळ्यावर बसून गाणें म्हणत आहे. ]

**मैनावती**— ( शिवगीत )

**अवतरे मातृभूमीच्या । रक्षणा ध्यार शिवराणा ॥**
**जमविला मावळामेळा । घाबरा म्लेंच्छ रिपु केला ॥ धृ० ॥**
**गांजिली मायभू त्यांनीं । छळिती बहु दैत्य ही अवनी ॥**
**पावला देव नवसाला । धांवला शिवप्रभू त्राता ॥ १ ॥**
**अरींच्या कृष्णमेघांनीं । ग्रासिला शिव तेजोराशी ॥**
**स्वकर-शर फेंकुनी वेगें । छेदिलीं शत्रुशिरकमलें ॥ २ ॥**
**मायभू-धर्म रक्षाया । लयाला दास्य तें न्याया ॥**
**जनीं स्वातंत्र्य वितराया । करीं घे शस्त्र शिवराया ॥ ३ ॥**
**वंदुनी शिवचरणा भावें । तयाला हृदयिं स्थापावें ॥**
**मुखानें तद्यशा गावें । शिवपदीं प्रेम अर्पावें ॥ ४ ॥**

कितीतरी सुरेख गाणं आहे हें ! मी कितीदां हें गाणं आपल्या मनाशीं गुणगुणतें आहे, पण अजून कांहीं मनाची तृप्ति होत नाहीं. खरोखर, त्यांचा अवतार ह्या भूमीचा उद्धार करण्याकरितांच झाला आहे. बाबा आदिकरून सर्व जहागिरदार त्यांना बंडखोर म्हणतात; आणि त्यांचे स्वातंत्र्याचे प्रयत्न हाणून पाडण्यासाठीं अनेक कारस्थानं रचीत आहेत; पण या मैनेच्या हृदयमंदिरांत त्यांच्या मूर्तीची जी एकदां प्राणप्रतिष्ठा झाली आहे, ती कोणत्याही कारस्थानानं तिथून नाहींशी होणार आहे का ?

बाबा, त्यांचं सामर्थ्य दिवसेंदिवस कसं वृद्धिंगत होत आहे तें पहा; त्यांच्या निशाणाखालीं मावळांतील अनेक सरदार हळुहळु गोळा होऊं लागले आहेत तिकडे दृष्टि फेंका; यवनांच्या जाचानं गांजलेले, अनेक मावळे लोक त्यांची एकनिष्ठेनं सेवा करण्यासाठीं, घरादारावर तुळशीपत्र ठेऊन स्वातंत्र्याच्या युद्धासाठीं आपलीं शिरकमलं हातावर घेऊन सज्ज झाले आहेत, हा देखावा पाहून अजूनही आपल्या अंतःकरणांत प्रकाश पडत नाहीं ना ? बाबा, तुम्ही त्यांच्याबद्दल कितीही तुच्छता दाखवा, किंवा त्यांच्या वाढत्या तेजामुळें तुम्ही त्यांच्याशीं कितीही तेढ बाळगा; पण ही तुमची कन्या मात्र अहोरात्र त्यांचंच चिंतन व गुणसंकीर्तन करून यशोगान गात राहणार !

[ पुन्हा वरील पद म्हणते. इतक्यांत **शेवंती** हातांत एक तसबीर घेऊन प्रवेश करते. ]

**शेवंती**—( स्वगत ) बाईसाहेब गाणं म्हणण्यांत अगदीं गुंगून गेल्या आहेत. आतां जरा गम्मत करूं या. (हातांतील तसबीर गोल मेजावर ठेवून हळूच जाऊन मैनेचे डोळे झांकते. )

**मैनावती**—कोण आहे तें ? माझे डोळे कोणीं झांकले ? काय तरी बाई चहाटळपणा ! हात तर कुणा स्त्रीचा दिसतो. पण कोण बरं असावी ? सोड म्हणतें ना माझे डोळे. काय, नाहीं सोडीत ? अग अवदसे ! माझे डोळे दुखूं लागले ना !

**शेवंती**—लागेनात बापडे !

**मैनावती**—( स्वगत ) हां; ही माझी बालमैत्रीण शेवंती असावी. (उघड) अग सोड लवकर डोळे !

**शेवंती**—मुळींच सोडायची नाहीं. माझं म्हणणं कबूल करशील तर सोडीन डोळे. नाहीं तर अस्से झांकून ठेवीन.

**मैनावती**—बरं बाई; तुझं जें कांहीं म्हणणं असेल तें मी कबूल करीन. आतां तर झालं ना तुझ्या मनासारखं ? हां; आतां सोड पाहूं डोळे.

**शेवंती**—अंहं ! माझ्या हातावर हात मारून मला वचन दिल्याशिवाय नाहीं माझी खात्री होणार !

**मैनावती**—किती ग अकरस्ताळी आहेस ! बरं, हें घे वचन. कर तुझा हात इकडे ! ( शेवंती तिच्या डोळ्यावरचा एक हात काढून तिच्यापुढें करते; इतक्यांत ती झटकन् डोळ्यावरचा शेवंतीचा दुसरा हात बाजूस सारते. ) कशी पण फसली आहेस ! माझ्यावर मात करतेस, नाहीं ?

**शेवंती**—बरं आहे. एवढ्यानं कांहीं झालं नाहीं. ह्याचा वचपा मी केव्हां-तरी काढीन बरं का !

**मैनावती**—बरं, तें जाऊं दे; तूं केव्हां आपल्या गांवाहून आलीस ? तुझी भेट होऊन पांचसहा वर्षं झालीं असतील.

**शेवंती**—पांच सहा ? एखादं अधिकच म्हण. फार दिवसांत तुझी भेट झाली नाहीं म्हणून मुद्दाम आलें हो.

**मैनावती**—तर तर मैत्रिणीची केवढी पण काळजी ! हां, मैत्रिणीच्या भावाला मात्र भेटायला आली असशील आणि म्हणे तुला भेटायला आलें. जसं कांहीं खरंच वाटेल कुणाला !

**शेवंती**—अग, खरोखरच तुला भेटायला म्हणून मुद्दाम आलें. कांहीं राजकारणापायीं तुझ्या वडिलांशीं मसलत करण्यासाठीं, माझे बाबा इकडे यायला निघाले तेव्हां मींही बाबांशीं हट्ट घेतला, कीं मीही तुमच्याबरोबर येतें म्हणून. त्यांनीं प्रथम बरेच आढेवेढे घेतले; पण माझा फारच आग्रह पाहून त्यांनीं मला आपल्याबरोबर इकडे आणली; आणि म्हणून तर मला या माझ्या बोलक्या मैनेचे मंजुळ बोल ऐकण्याचा योग आला.

**मैनावती**—आणि माझ्या प्रिय मैत्रिणीचं हें मुखकमल पाहाण्याचा मलाही योग आला ! पण काय ग, तुझे बाबा कांहीं राजकारणासंबंधीं वाटाघाट करायला आले आहेत म्हणून तूं म्हणालीस, तें कसलं राजकारण आतांच उपस्थित झालं आहे ?

**शेवंती**—अग, तुला माहीत नाहीं का ? परवां म्हणे रोहिडेश्वराच्या मंदिरांत, शिवाजीराजे आणि सर्व मावळे गोळा झाले होते. तिथं शिवाजीराजांनीं गो-ब्राह्मण-प्रतिपालनाची आपली प्रतिज्ञा जाहीर केली, आणि सर्वांनीं मिळून रोहिडेश्वरासमोर स्वराज्याच्या शपथा घेतल्या.

**मैनावती**—अहाहा ! हें ऐकून मला किती आनंद झाला म्हणून सांगूं !

**शेवंती**—त्या लोकांत माझा भाऊ रघूजीही होता. तो शपथ घेणार इतक्यांत बाबा त्वेषानं तिथं गेले आणि रघूजाला शपथेपासून त्यांनीं परावृत्त केलं.

**मैनावती**—अरेरे ! हें ऐकून मात्र माझं मन दुःखानं व्याकुळ झालं !

**शेवंती**—पुढं शिवाजीराजांची व बाबांची बरीच बोलाचाली होऊन रघूजीला बरोबर घेऊन बाबा घरीं निघून आले. या प्रकारामुळं रघूजीच्या मनास किती वाईट वाटलं म्हणून सांगूं !

**मैनावती**—साहजिकच आहे. रघूजीरावासारख्या तेजस्वी तरुणाला मातृभूमीची सेवा करण्याची आलेली अशी अपूर्व संधि हातची गेलेली पाहून खेद झाल्याविना कसा राहील ?

**शेवंती**—तेव्हांपासून बाबा तर अगदीं पिसाळल्यासारखं करताहेत. आदिलशहाकडे चुगली करून, त्याच्या साह्यानें आणि तुझे बाबा वगैरे जे खरेखुरे राजनिष्ठ मनसबदार असतील त्यांची मदत घेऊन, शिवाजीराजे व त्यांचे साथीदार यांना चांगलं भाजून काढण्याचं त्यांनीं ठरवलं आहे. व त्याच बाबतींत सल्लामसलत करण्यासाठीं ते इकडे आले असावेत असं मला वाटतं.

**मैनावती**—गडे शेवंती, तुझी ही हकीगत ऐकून माझं मन दुःखानं खिन्न होतं, तसं रागानं जळफळूंही लागतं. तुझे बाबा आणि माझे बाबा दोघेही एकाच माळेचे मणी आहेत. स्वतःच्या बडेजावांत दोघेही निमग्न ! राज्यकर्त्यांचे गोडवे गावेत व डोळ्यांवर कातडं ओढून चैनींत लोळत राहावं एवढंच त्यांना दिसतं. शिवाजीराजांची वाढती प्रभा त्यांच्या डोळ्यांना सहन होईनाशी झाली आहे. त्यांच्या निर्मळ देशसेवेच्या शुद्ध हेतूंत त्यांना बंडाचा वास येतो. आणि म्हणून दक्षिणेंतील यवनसत्तेचं भूत गाडण्याच्या शिवाजीराजांच्या कल्याणप्रद प्रयत्नांस,वाटेल त्या उपायांनीं हाणून पाडण्याचं त्यांच्या मनानं घेतलं असावं.

**शेवंती**—पण मैने, या वेळीं आपल्यासारख्या वीरकन्यांनीं कांहींतरी युक्ति करून, बाबांचे राष्ट्रघाताचे बेत जिथल्या तिथेंच जिरवून टाकून, शिवाजीराजांच्या पवित्र व कल्याणप्रद कार्यास हातभार लावावा, असं माझ्या मनांत आलं आहे.

**मैनावती**—माझ्यासुद्धां मनांत मघांपासून असंच कांहींतरी करण्याचं आलं आहे बघ. संसारांतील सर्वच कार्यं स्त्री-पुरुषांच्या ऐक्यबलानं घडून

येतात; मग मातृभूमीच्या सेवेची ही सोन्यासारखी संधि आपण कशी बरं वांया घालवूं ?

**शेवंती**--गडे, तुझा दृढनिश्चय व शिवाजीराजांच्यावरील तुझी ही अढळ निष्ठा पाहून मला किती आनंद झाला म्हणून सांगूं !

**पद**

**वचन तव सुखवि मजला ।**
**सांप्रत काला करि मज सबला ॥ धृ० ॥**
**अपुल्या देशा तोडुनि पाशा ।**
**मुक्त करूं, होऊंया वीर ॥ १ ॥**

या आनंदाबद्दल तुला मी एक वस्तु नजर करणार आहें.

**मैनावती**--कोणती ती वस्तू ? दे-दे पाहूं जल्दी.

**शेवंती**--अग पण हो; अशी अधीर काय होतेस ? जरा धीर धरशील कीं नाहीं !

**मैनावती**--लोकांची उत्कंठा वाढविण्याची तुला बाई खोडच आहे ! देना ती वस्तू.

**शेवंती**—ही पहा; ही एक तसबीर आहे. ( तसबीर हातांत घेऊन ) ओळख बरं कुणाची आहे ती !

**मैनावती**—पण अगोदर पाहूं तर देशील. पाहिल्याशिवाय बाई मला ती कोणाची आहे हें कसं ओळखतां येणार ? आण इकडे.

**शेवंती**—घे तर मग ही. ( तसबीर देते. )

**मैनावती**—गडे, किती तरी सुंदर रूप आहे हें !

**पद**

**रूप गोड मोहक किती ।**
**मोहे मना मोद देती ।**
**अलिकुलसम कुंतल अति ॥ धृ० ॥**
**वदनिं दिव्य तेज महा ।**
**नयन देतीं सौख्य अहा ।**
**सौंदर्या बहु खुलविती । नच राहे त्यास मिती ॥ १ ॥**

या मूर्तीची मी षोडशोपचारें पूजा करून नेहमीं तिचेंच चिंतन करीत राहणार. चल गडे, आपण याच क्षणीं या मूर्तीची स्थापना करून भक्ति-भावानं आराधना करूं. मी पूजेचं सर्व साहित्य घेऊन येतें. तोंवर तूं बागेंत जाऊन एकादी सुंदरशी पुष्पमाला गुंफून घेऊन ये जा लवकर.

[ तसबीर उच्चासनावर ठेवते व दोघीजणी निघून जातात. दुसऱ्या बाजूनें **बाजी घोरपडे** व **मालोजी मोहिते** प्रवेश करतात. ]

**बाजी घोरपडे**--मालोजीराव, या शिवाजीच्या बंडाचा फैलाव दिवसें-दिवस वाढतच चालला आहे. त्यांतून तुम्हीं सांगितलेली स्वराज्याच्या शपथेची बातमी ऐकून माझा नखशिखान्त संताप झाला आहे ! आरंभीं त्याचे प्रयत्न केवळ जहागिरीपुरतेच होते असें आम्ही समजत होतों; व म्हणून आम्हीं त्याच्याकडे दुर्लक्ष केलें; पण आतां तर खुद्द बादशाहीपर्यंत त्याचा हात लांबला आहे. शिवाय मालोजीराव, जावळीप्रकरणाची खबर कानीं पडल्यापासून तर, या बाजीच्या करारी मनाला कंप सुटून क्षणभर चरका बसल्याशिवाय रहात नाहीं. चंद्रावासारखा पराक्रमी योद्धा, व आदिल-शाहीचा अढळ आधार शिवाजीनें जगावेगळा केला, यावरून त्यानें आदिल-शाहीविरुद्ध, उघड उघड सामना सुरू केला असेंच म्हटलें पाहिजे. तेव्हां सर्व राजनिष्ठ सरदारांची एकजूट करून त्याचा कायमचा बंदोबस्त आपण त्वरित केला पाहिजे. यापुढें मात्र स्वस्थ बसून भागायचें नाहीं.

**मालोजी**--आतां आपण स्वस्थ बसलों, तर हा शेणामेणाचा शिवाजी उद्यां लोखंडाचा बनून, आपल्या भाराखालीं तो सर्वांना चिरडून टाकल्या-शिवाय राहणार नाहीं !

**बाजी घोरपडे**--त्याच्या बापाला भिंतींत चिणून मारण्याचा मीं मागें घाट घातला होता. पण याच शिवाजीनें ऐन वेळीं दिल्लीहून शहाजहान बादशहाचा जरबेचा खलिता आणल्यामुळें आणि महंमदशहाच्या भित्र्या स्वभावामुळें त्या वेळीं माझा डाव साधला गेला नाहीं, आणि मोहरें माघारें घेऊन मला नामोहरम व्हावें लागलें ! पण तेव्हांपासून भोंसल्याविषयींच्या वैराग्नींत तेल पडून, या बाजीच्या अंगाची लाही लाही होत आहे !

**मालोजी**--तरी पण घोरपडे, ही गोष्ट मात्र स्पष्ट आहे कीं, मोऱ्यांच्या वधापासून शिवाजीच्या पराक्रमाचा वचक सर्वांना बसला असून सुर्वे,

सावंत, दळवी वगैरे सरदार, राजसत्तेचें जूं झुगारून देऊन त्याच्या गोटांत शिरले आहेत. तेव्हां त्याचा कांहींतरी पक्का बंदोबस्त जर आपण त्वरित केला नाहीं तर या शिवाजीच्या वावटळींत, आम्हां मनसबदारांचीं मस्तकें मशकासारखीं उडून मातीमोल होतील अशी भीति वाटते.

[ **सूर्याजी** प्रवेश करतो. ]

**सूर्याजी**—काय बिशाद लागली आहे त्याची ! बाबा, तुम्ही सर्व स्वस्थ राहा. हा सूर्याजी जिवंत असतांना तुम्हीं कोणींही काळजी करण्याचें कारण नाहीं. एकदोन महिन्यांच्या आंत त्या शिवाजीच्या बंडाचा बींमोड करून मी त्याला या जगांतून नेस्तनाबूद करून टाकतों !

**मालोजी**—बेटा सूर्याजी, तू मोठा पराक्रमी वीर आहेस हें मला कबूल आहे; पण त्या शिवाजीला नेस्तनाबूद करणें फुकाची गोष्ट नाहीं ! अरे, क्षणोक्षणीं त्याची शक्ति वाढते आहे. दक्षिणेंतील लोक त्याला ईश्वराचा अवतार मानताहेत व मावळांतील अनेक स्वामिनिष्ठ सरदार त्यांच्या झेंड्या-भोंवतीं गोळा झाले आहेत. तेव्हां शिवाजीला निर्माल्यवत् करायचाच तर तो हिकमतीनें केला पाहिजे.

**सूर्याजी**—तुम्हां वृद्धांना आमच्यासारख्या तरुणांचा तेजोभंग करण्यांत काय भूषण वाटतें, कोणास ठाऊक ! आमच्या पराक्रमाला तुम्ही मुळीं अवसरच देत नाहीं. तेंच तो शिवाजी पहा. त्यानें वृद्धांना दूर सारून तरुणांना हाताशीं धरलें; आणि म्हणून तो आज प्रबल झाला असून तुम्हां वृद्धांना त्यानें सळो कीं पळो करून सोडलें आहे.

**मालोजी**—तरुणांची तादृश तडफ, परिणामीं घातुक ठरल्यावांचून राहात नाहीं. आम्हां वृद्धांचा शांत व धिमेपणाचा मार्गच हितपरिणामी होत असतो, समजलास ?

**बाजी घोरपडे**—सूर्याजी, मालोजीरावांचें म्हणणें कांहीं खोटें नाहीं. वृद्धांच्याविषयीं तूं जे अनादराचे उद्गार काढलेस, तेही तुम्हां तरुणांच्या अविचारी तडफेचेच द्योतक आहेत. तरुणांचा तेजोभंग करावा असा आमचा मुळींच इरादा नाहीं. तरुणांच्या शौर्यास योग्य तो अवसर व मान आम्ही अवश्य देऊं; पण त्याच बरोबर आम्ही सारी भिस्त मात्र त्यांच्यावर टाकणार नाहीं. शिवाजीचें बंड मोडणें तुला वाटतें तितकें सोपें नाहीं.

**सूर्याजी**--अस्सल मराठ्याचें रक्त माझ्या नसानसांतून खेळत आहे. पराक्रमी बाजी घोरपड्यांचा मी पुत्र आहें. ह्या सूर्याजीस अशक्य अशी कोणती गोष्ट ह्या दुनियेंत आहे ? बाबा, तुमच्या पवित्र चरणांची शपथ घेऊन मी प्रतिज्ञा करतों कीं, आजपासून दोन महिन्यांचे आंत, त्या बंडखोर शिवाजीला शरण आणीन किंवा त्याचं शीर कापून तुमच्यापुढें हजर करीन ! ( समोर शिवाजीची तसबीर पाहून ) अरे ! पण हें काय ? त्या बंडखोर राजद्रोह्याची तसबीर आणि आमच्या वाड्यांत !

**बाजी घोरपडे**--( रागानें उसळून ) कोणाचं हें कृत्य ? आमच्यासारख्या राजनिष्ठांच्या घरांत त्या अराजकाची तसबीर आणणारा हा कोण कर्मचांडाळ ? आमच्या घराण्याच्या राजनिष्ठेवर भलतीच तोहमत आणण्यासाठीं, कोणा तरी दुष्ट घरभेद्यानें हें निंद्य कृत्य केलें आहे खास. पादशहाच्या कानावर जर ही गोष्ट गेली तर माझ्या आजपर्यंतच्या राजनिष्ठेवर पाणी पडून सर्व अधिकार, मानमरातब व अब्रू यांची धुळधाण होऊन पादशहा माझें डोकें उडविल्याशिवाय रहाणार नाहीं. बस्स ! हें कोणाचें कृत्य आहे तें मला समजलेंच पाहिजे. सूर्याजी, हा गुन्हा कोणीं केला त्याचा तपास करून त्या गुन्हेगारास माझ्या समोर घेऊन ये.( सूर्याजी जाऊं लागतो. ) पण थांब, अगोदर ती तसबीर इकडे आण पाहूं. ( तो तसबीर आणून देतो. ) ही तसबीर अगोदर जगांतून नाहीशी केली पाहिजे. ( तसबिरीकडे पाहून ) अहो बंडखोर सरदार, तुम्ही तर आमच्या अंतर्गृहांत प्रवेश केलात अं ? पण ध्यानांत ठेवा, हा बाजी घोरपड्याचा महाल आहे. या सिंहाच्या गुहेंत तुमच्यासारख्या जंबुकांनीं शिरण्याचें धाडस केलें, तर त्याचा परिणाम काय होतो पहा. ह्या तसबिरीस पायाखालीं तुडवून—

[ तसबीर पायाखाली तुडविणार इतक्यात मैनावती धांवत येऊन तसबीर काढून घेते. ]

**मैनावती**—हां-हां ! बाबा, हें काय करतां आहां तुम्ही ?

**बाजी घोरपडे**—कोण ? मैने, तूंच का ? तूंच ही तसबीर इथें आणलीस ?

**मैनावती**—होय बाबा, मींच ही तसबीर नित्य-पूजेसाठीं आणली आहे.

**सूर्याजी**—मैने, जीभ लांब करून बोलायला तुला शरम नाहीं वाटत ! म्हणे पूजेसाठीं आणली आहे. पूजा करायला शेंकडों देव पडले आहेत.

त्यांना सोडून तूं ह्या राजद्रोही माणसाची पूजा करणार ? थांब; बाबा आता हिची चांगली पाद्यपूजा करणार आहेत !

**मैनावती**--दादा, जिभेला जरा आंवरून धर ! बाबा, शांत व्हा, विनाकारण क्रोधाधीन होऊन भलताच अविचार करूं नका. ही तसबीर मीं इथं आणली, तर त्यांत एवढं तुम्हांला आकाशपाताळ एक करायला काय झालं ?

**बाजी घोरपडे**--कार्टे, तुझा हा अपराध इतका भयंकर आहे कीं, तूं माझी मुलगी नसतीस तर येथल्या येथें तुझी गर्दन उडविली असती. मैने, तुझा फाजीलपणा फारच वाढत चालला आहे अलीकडे. तुझ्या कृतीनें पादशहाचा माझ्यावर केवढा कोप होईल त्याची तुला कल्पना तरी आहे का ? अमीर-उल्-उमराव असा पादशाही किताब मस्तकावर धारण करून, दरबारांत बसणाऱ्या या बाजीच्या कपाळावर, तुझ्या कृतीनें पादशहाकडून राजद्रोहाचा शिक्का मारला जाईल, आणि त्यामुळें बेशान होऊन मला लाचार व्हावें लागेल, हें तुला समजत नाहीं ? जो पादशहाचा--आम्हां सर्वांचा--शत्रू म्हणून ठरला गेला आहे, त्याच्या तसबिरीस पूज्य मानून तूं त्याची भक्तिभावानें पूजा करणार होय ? आण ती तसबीर इकडे. मीच तिची यथास्थित पूजा करतों. चल दे ती मजजवळ.

**सूर्याजी**--बऱ्या बोलानें दे ती तसबीर बाबांच्यापाशीं.

**मैनावती**--प्राण गेला तरी ही तसबीर मी तुमच्यापाशीं देणार नाहीं.

**बाजी घोरपडे**--अस्सें ! ठीक आहे ! सूर्याजी, घे ती तसबीर तिच्याजवळून हिसकावून. ( **सूर्याजी** तसबीर घेण्यास जातो. )

**मैनावती**--दादा, मी तुझ्या पायां पडतें. बाबा, नका हो असे निष्ठुर होऊं ! माझा हा प्राण नका हो माझ्यापासून हिरावून घेऊं.

**सूर्याजी**--तें आम्हीं कांहीं एक ऐकणार नाहीं. त्या दुष्टाच्या तसबिरीचा बाबांच्या पराक्रमी पायाखालीं चुराडाच झाला पाहिजे. चल दे लवकर. काय ? नाहीं देत ? तुला अशी बाजूस सारून तुझ्या बळकट मिठींतून ही पहा ती मी अशी हिसकावून घेतों. ( मैनेला बाजूस करून तसबीर काढून घेतो. )

**बाजी घोरपडे**--शाबास सूर्याजी ! आण ती इकडे. हिची तुला पूजा करायची आहे ना ? मग ही पहा मी तिची कशी पूजा करितों तें. ( तसबीर तुडविणार इतक्यांत शेवंती धावत येऊन त्याला अडविते. )

**शेवंती**--हां, खबरदार ती तसबीर पायाखालीं तुडवाल तर !

**मालोजी**--हां-हां ! पोरी, तूं कशाला इथें आलीस?

**शेवंती**--बाबा, तुमच्यासमोर हा असा अन्याय होत असतांना तुम्ही स्तब्ध उभे राहिलां आहांत ? तुम्ही पुरुषासारखे पुरुष असून हा अघोर अन्याय तुमच्यानं सहन होतो तरी कसा ? पुरुष नामर्द नि भेकड बनले म्हणजे आम्हां स्त्रियांनाच अन्यायाचा प्रतिकार करण्यासाठीं असं धांवून यावं लागतं.

**मालोजी**--पोरी, चालती हो इथून.

**सूर्याजी**--बाबा, पहात काय राहिलांत ? तुडवा ती पायांखालीं.

**शेवंती**--( पाय धरून ) हे पाय मी असे धरून ठेवणार. महाराज, त्या तसबिरीवर आपला एवढा राग कां ? शिवाजीमहाराज तुमचे शत्रु असले, त्यांची नुसती तसबीर तुमच्या घरांत असल्यानं तुमच्या घराण्याला आग लागत असली तर ती माझ्या स्वाधीन करा. मींच ती घटकेपूर्वीं प्रेमाची खूण म्हणून मैनेला नजर केली होती. त्या नुसत्या निर्जीव चित्रानं जर तुम्ही इतके हैराण झालां, तर मग प्रत्यक्ष शिवाजीमहाराजांशीं गांठ पडल्यावर तुमची काय त्रेधा उडेल ? द्या ती मजजवळ.

**बाजी घोरपडे**--चल, हाट बाजूला !

**मैनावती**--बाबा, द्या ना ती तसबीर तिला. त्या पवित्र मूर्तीचा असा अपमान होणं चांगलं नाहीं.

**बाजी घोरपडे**--चूप बैस, पोरी ! तूं आणि तुझी साथीदार ही शेवंती दोघीही सारख्याच गुन्हेगार आहांत. तुम्हांला या राजकीय उलाढालींत पडायला सांगितलें आहे कुणीं ? तुम्हां बायकांना--त्यांतून तुमच्यासारख्या उद्धट पोरींना--तर बिलकुल अक्कल नसते. शेवंती, माझे पाय सोडून येथून निघून जा.

**शेवंती**--माझी तसबीर मला मिळाल्याशिवाय मी हे पाय कधींही सोडणार नाहीं.

**मैनावती**--बाबा, हा काय भलताच हट्ट धरला आहे तुम्हीं ? देऊन टाका तिची तसबीर. मी पदर पसरून विनंती करतें, त्या थोर पुरुषाचा पुण्य देह पायां-खालीं तुडवून रौरवाचं साधन करूं नका ! माझ्या पित्याच्या हातून हें अघोर

निंद्य कर्म मी घडूं देणार नाहीं. या चरणांना मी अशी मिठी घालून बसेन.
[ पायीं धरते. ]

**बाजी घोरपडे**—मैने, शेवंती, व्हा पाहूं दोघींही बाजूला. नाहींतर माझ्या लत्ताप्रहारांचा प्रसाद त्या तसबिरीस मिळण्याआधीं, तुम्हांला मिळेल.

**शेवंती**—शिवाजीमहाराजांच्या मूर्तीसाठीं, आम्ही एकदां सोडून दहादां लाथा खाऊं.

**मैनावती**—त्यांत आम्हांला भूषणच आहे.

**सूर्याजी**—बाबा, द्याच त्यांना थोडासा प्रसाद. तुम्हांला लाथा खाण्यांत भूषण वाटतें, नाहीं ?

**मैनावती**—हो. राज्यकर्त्यांच्या लाथा खाण्यांत तुम्हांला नाहीं का भूषण वाटत ?

**बाजी घोरपडे**—कार्टी फारच बेताल बडबडूं लागली ! मालोजीराव, तुम्ही आपल्या मुलीला बाजूला ध्या पाहूं. आणि सूर्याजी, तूं मैनेला बाजूला ओढ.

**मालोजी**—मूर्ख पोरी, हा काय वेडेपणा चालविला आहेस ? चल, इकडे ये पाहूं अशी. ( शेवंतीला बाजूला करतो. )

**सूर्याजी**—हं, लाथाखाऊ ताईसाहेब, तुम्हीही व्हा बाजूला ! ( मैनेला ओढून बाजूला करतो. )

**बाजी घोरपडे**—त्या बंडखोर राजद्रोही अराजकाच्या प्रतिमेचा, माझ्या लत्ताप्रहारानें हा पहा चेंदामेंदा करून टाकतों.

[ तसबीर पायांखालीं तुडविणार तोंच मैनावती तसबिरीवर अंग टाकते. बाजीची लाथ तिच्या अंगावर बसते. शेवंती डोळे मिटून घेते. पडदा पडतो. ]

---

## प्रवेश २ रा

[ **स्थळः—रामेश्वर** भटजींचें घर. रामेश्वर प्रवेश करतो. ]

**रामेश्वर**—छे, छे, छे, छेः ! ह्या ब्राह्मण जन्मानें तर नाकीं नव आणले ! मीं मागल्या जन्मीं कोणतें पाप केलें होतें, म्हणून परमेश्वरानें ह्या रामेश्वराला असल्या द्वाड ब्राह्मण जन्मांत ढकललें ! प्राचीन काळीं ब्राह्मणवर्गाचें केवढें

वर्चस्व होतें ! 'राजा बोले आणि दळ हालें' त्याप्रमाणें 'ब्राह्मण बोले आणि अमावास्या ठरे,' अशी पूर्वी आमची वैभवशाली स्थिति होती; पण आज ह्या कलियुगांत, ह्या यवनांच्या राज्यांत, आम्हां ब्राह्मणांची फारच दुर्दशा झाली आहे ! आजकाल ब्राह्मण होणें म्हणजे महापातक करणें होय. प्राचीन काळचे ते 'शापादपि शरादपि' ब्राह्मण कोणीकडे, आणि आम्ही स्वतःचा जीव कसा जगेल या विवंचनेंत पडलेले ब्राह्मण कोणीकडे ! द्यावापृथ्वीचें अंतर ! पूर्वी कोणाचें बारसें असो कीं बारावें असो, ब्राह्मण आपला दर्भ-समिधा घेऊन हजर; पण या धामधुमीच्या काळांत बारसें तर राहोच; पण आमचेंच बारावें होण्याची वेळ आली आहे. घराबाहेर पडायची खोटी ! एकादा दाढीदीक्षित अपशकुन करायला आपला दत्त म्हणून उभा ! या लोकांची ब्राह्मणांच्या शेंडीवर गिधाडासारखी नजर असते. शंकरानें जटा आपटून वीरभद्र निर्माण केला, तसा माझ्या ह्या शेंडींतून जर एकादा भद्रवीर उत्पन्न होईल तर काय बहार होईल ! पण छेः ! त्या त्रेतायुगांतील गोष्टी. कलियुगांतील ह्या रामेश्वराच्या शेंडींत एवढें सामर्थ्य कुठून यायला ! आजकाल ब्राह्मणांना काळ मोठा कठीण आला आहे हेंच खरें. देवा ! अशा यवनी वातावरणांत मला ब्राह्मण आई-बापांच्या पोटीं लोटण्यांत तूं मोठी चूक केलीस. बरें, ही चूक केलीस ती केलीस; पण निदान जन्मतांच मला दाढीमिशी दिली असतीस तर मी गर्भश्रीमंताप्रमाणें गर्भयवन झालों असतों ! पण विधात्याला तेवढी अक्कलच सुचली नाहीं; का लोकांना अकलेची खैरात करतां करतां 'वाटी त्याला पाटी' अशी त्याची अवस्था झाली न कळे ! तें कांहीं नाहीं; देवाची चूक आपण दुरुस्त केलीच पाहिजे. स्वतः मुसलमान झाल्याशिवाय माझ्या मागची ही म्लेंच्छांची साडेसाती सुटायची नाहीं. बस्स ! आपण मुसलमान होणार !

[ **काशीबाई** येते. ]

**काशीबाई**—अहाहा ! काय पण अकलेचे तारे तुटताहेत !

**रामेश्वर**—आलांत का आपण ? तूं तर मला अगदीं नको नकोसें केलें आहेस ! बाहेर यवनांच्या छळांत आणि घरांत तुझ्या त्रासांत, अशी अडकित्त्यांत सांपडलेल्या सुपारीगत माझी गत झाली आहे. आतां कांहीं माझी धडगत दिसत नाहीं.

**काशीबाई**--अथवा जात्याच्या पेडांत सांपडलेल्या दाण्यासारखी म्हणा हवी तर. पण इतकं वैतागायला झालं काय ?

**रामेश्वर**--त्याची कारणमीमांसा पाहिजे आहे कशाला ? पण इतका वेळ आपली धिंडका गेली होती कुठें ?

**काशीबाई**--कुठं म्हणजे ? देवदर्शनाला.

**रामेश्वर**--देवदर्शनाला ना ? हां ! मग लागलाच निकाल !

**काशीबाई**--हें काय बाई तऱ्हेवाईक बोलणं तरी ?

**रामेश्वर**--अगोदर आंत जाऊन आंग धुऊन तुळशीला प्रदक्षिणा घालून ये.

**काशीबाई**--म्हणजे ? मी नाहीं समजलें आपल्या बोलण्याचा अर्थ !

**रामेश्वर**--आतां जास्त बोलून अनर्थ करून घेशील कदाचित्. तूं देवदर्शन करून आलीस ना ? मग येतांना वाटेंत एकाद्या धटिंगण यवनाचा तुला स्पर्श झाल्याशिवाय कसा राहिला असेल ? तूं एकादद्सऱ्याच देवाला भेटली असशील, पण तुला अनेक देव भेटून गेले असतील ना ! म्हणून म्हणतों, जा आधीं अंगावर दोन तांबे ओतून घेऊन शुद्ध हो.

**काशीबाई**--पण आपण शुद्धीवर या अगोदर ! कांहींतरीच आपलं बरळायचं ! मला कोणाचाही स्पर्श झालेला नाहीं.

**रामेश्वर**--झूट बात; पक्की लबाडी ! देवदर्शनाला गेलेली कोणतीही स्त्री परपुरुषाचा स्पर्श झाल्याशिवाय घरीं परत येणें शक्यच नाहीं. निदान जगांत पाजी लोकांची पैदास सुरू आहे तोंपर्यंत तरी अशी गोष्ट शक्य नाहीं खास. देवदर्शनाच्या सबबीवर पतीला घरांत माशा मारीत बसवून, ह्या पतिव्रता स्त्रियांनीं खुशाल गांवभर धिंगाणा घालावा.

**काशीबाई**--असं वेडंविद्रं बोलायला कांहीं वाटतं तरी का ? देवधर्म, उपासतापास हा आम्हां स्त्रियांचा धर्मच आहे; आणि हें सर्व आपल्या पतीच्या कल्याणासाठींच बायका करीत असतात हो !

**रामेश्वर**--हो, घरांतल्या देवाला धूप घालून विचारायचें नाहीं आणि बाहेरच्या देवापुढें मात्र नंदादीप पाजळायचा ! नको, असल्या बायकांचा

संबंध नको आणि हा संसाराचा वणवाहि नको! जातों; अंगाला राख फासून कुठेंतरी दूर–गिरिकंदरांत तपश्चर्येलाच जातों. ( जाऊं लागतो. )

**काशीबाई**––बायकोशिवाय आपल्याला एक क्षणभरही करमत नाहीं! ती कुठं जरा देवदर्शनाला गेली तरी तुमच्या अंगांत भूत संचारतं; मग गिरिकंदरांत गुजारा कसा करणार तुम्ही?

**रामेश्वर**––मग मी मुसलमान होतों. म्हणजे सत्ता, संपत्ति, संतति यांची प्राप्ति होऊन, एक सोडून शंभर बायकांचा मी दादला बनेन. बस्स, लाडके, मी आतां बाटून मुसलमानच होणार.

**काशीबाई**––गडे, आपण असं अभद्र बोलूं नये. ते शिवाजीमहाराज आहेत ना? त्यांनीं गो–ब्राह्मणांचा प्रतिपाल करण्याची व आपलं स्वतंत्र राज्य स्थापण्याची प्रतिज्ञा केली आहे; तेव्हां आतां आपण काळजी करण्याचं कारण नाहीं. ते खात्रीनं आपला संभाळ करतील.

**रामेश्वर**––मूर्ख आहेस झालें! अग, शिवाजीच काय पण त्याचा बाप जरी आला, तरी या यवनांच्या जांचांतून आमची मुक्तता होणें कठीण आहे. यवनांचे ग्रह सांप्रत फार उच्चीचे आहेत. मीं कालच त्यांची पत्रिका पाहिली. त्यांत केंद्रीं शुक्र, दशमांत मंगळ आणि पराक्रमांत रवि, शनि, राहु असे बलवान् ग्रह जोंपर्यंत आहेत, तोंपर्यंत आम्हां ब्राह्मणांच्या पाठीमागचा ह्या यवनांचा त्रास चुकेल अशी कल्पनासुद्धां करणें वेडेपणाचें आहे.

**फाजलखान**––( आंतून ) अरे, अन्दर कौन है? किवाड खोलो.

**रामेश्वर**––अरे, बापरे! यमदूत आले वाटतं!

**काशीबाई**––अगदीं शंभर वर्सं आयुष्य आहे मेल्यांना!

**रामेश्वर**––बघितलास ना पत्रिकेचा पडताळा? आणखी शंभर वर्षें तरी म्लेंच्छांना मरण नाहीं!

**करीमखान**––( आंतून ) अरे शैतान, दार खोलो जल्दी.

**काशीबाई**––आतां काय करायचं?

**रामेश्वर**––डोंबल करायचें? मला तर हुडहुडी भरावयाला लागली आहे! हे राक्षस आमच्याच कां एवढे राशीला लागले आहेत, देव जाणे!

**फाजलखान**--( आंतून ) कितना देर लगाया है ! फौरन किवाड खोलो, नहीं तो किवाड तोड डालेंगे. ( दारावर धक्के देतो. )

**काशीबाई**--अगबाई ! हे तर आतां दार फोडणार वाटतं ? उघडूं कां दार ?

**रामेश्वर**—तुला कां त्यांचा एवढा कळवळा येत आहे ? करूं दे त्यांना बाहेरून हवा तेवढा शंख !

**काशीबाई**—अहो, ते दार फोडून आंत येतील ना ? उगीच दाराचं नुकसान नाहीं का होत ?

**रामेश्वर**—तुझ्यासारख्या दारेचें नुकसान होण्यापेक्षां, दाराचें नुकसान झालें तरी चालेल ! मला माझ्या जिवाची काळजी आणि हिला लागली आहे दाराची काळजी ! त्यांना सांग, आंत कोणीसुद्धां नाहीं. उगीच दार ठोठावूं नका.

**काशीबाई**—शर्थ झाली बाई ! अस्सं अगदीं धडधडीत खोटं बोलायचं ?

**रामेश्वर**—अग दळभद्रे, जिवावर बेतली असतां खुशाल खोटें बोलावें असें धर्मशास्त्रच आहे.

**काशीबाई**—अहो, तें सारं खरं; पण आपलं खोटं त्यांना खरं वाटलं पाहिजे ना ?

**फाजलखान**— (दारावर धक्के देत) अरे शैतान, सूवरका बच्चा, खोल किवाड ! बदकार, बदमाश !

**रामेश्वर**—हां; आज ह्या रामेश्वरावर शिव्यांची लाखोली दिसते आहे. द्या म्हणावें हव्या तेवढ्या शिव्या ! तुमच्या ह्या मुसलमानी शिव्या आम्हां ब्राह्मणांना थोड्याच लागणार आहेत ?

**करीमखान**— (आंतून) अरे साले, खोलता है कि नहीं ?

**रामेश्वर**—हं; अग आतां कांहीं आपली धडगत नाहीं. आपली मृत्यु-घटका भरत आलेली दिसते. पण ह्या वेळीं धीर सोडतां कामा नये. कांहीं तरी युक्तीनें जीव बचावला पाहिजे. (विचार करून) हें बघ, आंत जाऊन एखादें लुगडें आण पाहूं.

**काशीबाई**— (हंसून) इश्य बाई ! लुगडं कशाला ?

**रामेश्वर**—तुझा नवरा कसा डोकेबाज आहे तें तुला दाखवितों. जा, आधीं एक लांब रुंद लुगडें घेऊन ये.

[ ती आंत जाऊन सासूचं तांबडं लुगडें आणते. तें तो कसेंतरी वेढून डोक्यावरून पदर घेतो. ]

**काशीबाई**—इश्य ! हें काय सोंग !

**रामेश्वर**—चूप बैस. अग, प्राणांसाठीं व पोटासाठीं पुरुषांनीं खुशाल स्त्री-वेष घ्यावा असें धर्मशास्त्रच आहे मुळीं ! बरें, तें जाऊं दे. हें बघ, आतां मी सांगतों तसें कर. मी येथें डोक्यावरून पदर घेऊन बसतों. ते सैतान आंत आले आणि त्यांनीं . विचारलें कीं ही दुसरी बाई कोण ? म्हणजे सांग, ही माझी आई आहे म्हणून. चुकूं नकोस. माझा जीव तुझ्या जिभेंत आहे असें समज. बिलकुल घाबरूं नकोस. मी भेदरून गेलों असलों तरी तूं पुरुषासारखी धीट बनून त्यांच्या प्रश्नांना उत्तरें दे आणि माझे प्राण वांचीव. आलें ना ध्यानांत ? (पदर घेऊन बसतो.) हं, बसलों मी, आतां उघड दार.

**काशीबाई**—काय तरी बाई विचित्र तऱ्हा ! चला आतां दार उघडावं. आलें हो आलें. [ आंत जाऊन दार उघडते. **फाजल** व **करीम** यांच्यासह परत येते. ]

**फाजलखान**--क्यौं बे लवंडी, इतना देर क्यौं लगाया किवाड खोलनेको ?

**काशीबाई**--( थोडा विचार करून ) कुलपाची किल्लीच सांपडत नव्हती हो. ती शोधून काढायला इतका वेळ लागला.

**फाजलखान**--क्यौं रे करीमभाई, ये कुंजी कायकू धुंडती थी ?

**करीमखान**—फाजलभाई, हें कोणातरी ब्राह्मणाचें घर दिसतें आहे. आणि हे ब्राह्मण लोक म्हणजे मुलखाचे भित्रे. म्हणून ते बाहेर जातांना दाराला बाहेरून व आंत असतांना आंतून कुलपें लावतात.

**फाजलखान**--क्या ताज्जुबकी बात है!अच्छा ए लवंडी वह शैतान कहां है?

**रामेश्वर**—(स्वगत) अरे भगवाना! माझीच चवकशी करतोय हा चांडाळ!

**काशीबाई**—कोण पाहिजे आपल्याला ?

**फाजलखान**—वह शैतान चाहिये.

**करीमखान**—तो डोंगरांतला उंदीर शिवाजी कुठें आहे ? तो पाहिजे आम्हांला.

**काशीबाई**—अहो मिय्यासाहेब, शिवाजी कां वाटेवर पडला आहे; तर तो तुम्हांला आणून द्यावा ?

**फाजलखान**—लेकिन् हम् तो उसकोही गिरफदार करनेको निकले हैं.

**करीमखान**—सुभेदार मोहबतखानसाहेब आम्हांला मोठी जहागीर देणार आहेत या कामगिरीबद्दल.

**फाजलखान**—अरे यार, जहागीर तो क्या; बादशहा सलामत तो मुझे सिपहसालार बनानेवाले हैं ! मगर बात तो यह है, कि वह शैतान हमें कैसा मिलेगा ?

**करीमखान**—काय ग पोरी, आतां येथें शिवाजी होता ना ? मग कुठें गेला एवढ्यांत ? (बुरख्यांतील रामेश्वराकडे पाहून) आणि हें बुरखा घेतलेलें कोण आहे ?

**फाजलखान**—अरे यार, वह शिवाजी होगा. ठैरो, मैं देखता हूँ (जाऊं लागतो).

**काशीबाई**—(त्याला अडवून) हां, हां. तिकडे जाऊं नका. तिकडे गोषा आहे.

**करीमखान**—आं ! ब्राह्मणलोक गोषा कधींपासून पाळूं लागले ?

**रामेश्वर**—(स्वगत) तुमच्यासारखे सैतान त्यांच्या मानगुटीवर बसूं लागल्यापासून !

**फाजलखान**—क्यौं बे लवंडी, यह किसका गोषा है ? यह का तेरी औरत है ?

**रामेश्वर**—(स्वगत) गाढवाची अक्कल बघा !

**करीमखान**—ए पोरी, ही बुरखेवाली कोण आहे ? झट् बोल.

**रामेश्वर**—(हळूंच) त्यांना सांग माझी आई आहे म्हणून !

**काशीबाई**—(मानेला हिसडा देऊन) इश्य ! कांहींतरीच !

**रामेश्वर**—(हळूंच) अग, ही मुरका मारण्याची वेळ नाहीं; कंठीं प्राण आले आहेत माझे. आतां तोंडास येईल तें बोलून माझी सुटका कर. माझी आई आहे असें सांग.

**काशीबाई**—मी नाहीं जा. (लाजून पाठमोरी उभी राहते).

**रामेश्वर**--काय अवदसा आहे तरी ! इकडे माझ्या नाकाशीं सूत धरण्याची वेळ आली आहे आणि याच वेळीं हिच्या श्रृंगाराला ऊत आला आहे ! हां सांग, माझे आई ! नको पाहूंस आतां माझा अंत !

**फाजलखान**--क्यों करीमभाई, उस छोकरीका मुँह क्या ताक रहा है ? चल, उस गोषाके अंदर क्या चीज है देखना तो सही !

**करीमखान**--हां-हां, चलिये. ( फाजल रामेश्वराला धरण्याकरितां पुढें सरकतो. ) फाजलभाई, जरा समालके जाना. वह शिवाजी बडा बदकार आदमी है. झट् तमंचा निकाल कर तेराही निकाल कर देगा !

**फाजलखान**--( घाबरून ) ऐसा है ? तो तूही आगे बढकर उसको दस्तगीर कर. पीछेसे मैं उसको पकडूंगा.

**करीमखान**--लढनेकू मैं, और जहागिरका लड्डू खानेकू तूं ? यार बडे हुशार हो !

**फाजलखान**--वैसा नहीं जी.

**करीमखान**--फिर कैसा जी; कहो तो सही ?

**फाजलखान**--मै बूढा हूँ; और तू नवजवान है. मुझे तो डर लगता है.

**करीमखान**--तो फिर तुम दिखनेमें ढब्बू और चलनेमें शिवराई है.

**फाजलखान**--अभी ऐसा करो, एक ओरसे मैं और दूसरी ओरसे तूं उसपर शेरके माफिक हमला करेंगे.

**करीमखान**--हां हां, ऐसाहि करेंगे. ( दोघे दोन बाजूंनीं दबत दबत जाऊन रामेश्वरास पकडतात. )

**फाजलखान**--मैंने पहिले पकडा इसको.

**करीमखान**--नहीं नहीं, मैंनेहि पहिले पकडा है.

**रामेश्वर**--अरे यमदूतांनो, मला कां गरिबाला पकडतां तुम्ही ? मी तुमचा काय अपराध केला आहे ?

**करीमखान**--तूं शिवाजी है !

**फाजलखान**--तूं शैतान है !

**करीमखान**--तूंने मोगल बादशहाको सताया है !

**फाजलखान**--तूंने दख्खनदौलत बरबाद की है.

**करीमखान**--तूं बदमाश है !

**फाजलखान**—तूं बदकार है !

**रामेश्वर**—हां, चालूं द्या शिव्यांची सरबत्ती; तुमच्या मुखाची मुलुख-मैदान तोफ बंद करूं नका. कां, संपला का सगळा गोळीबार ?

**फाजलखान**—तुझे पकडकर हम मोहबतखानसाहेबके सामने पेश करेंगे. जिससे सुभेदारसाहेब बडे खुष होंगे; और मुझे वे भारी जिंदगी और इज्जत देकर सरफराज करेंगे. चलो हमारे साथ !

**करीमखान**—सीधी चालसे चलेगा तो ठीक, नहीं तो गुद्दे और ठोंसे चखाने पडेंगे, समझे ?

**रामेश्वर**—देवा, काय रे हा कठीण प्रसंग आणलास माझ्यावर! शिव शिव ! ज्यांची नुसती सांवली पडली तर मी सचैल स्नान करीत असें; त्याच या म्लेंच्छांनीं आज मला आपल्या पकडींत पकडलें कीं हो ! अरे, आमचे तेहतीस कोटी देव मरून दगड झाले का रे ? कोणी तरी धांवत या आणि या दोन नक्रांच्या तावडींतून ह्या गजेंद्राला सोडवा. गोपालकृष्णा, लवकर धांवत येऊन या द्रौपदीची लाज राख रे बाप्पा! ( डोळ्यांना पदर लावतो. )

**फाजलखान**—ए शैतान, क्या पागलके माफिक बकवा चलाया है ?

**रामेश्वर**—अरे बाबांनो, तुम्हांला काय वेड लागलें आहे; का आज शराब जास्त झाली ? मी शिवाजी नाहीं, मी रामेश्वर आहें.

**करीमखान** – नाहीं, तूंच शिवाजी आहेस.

**फाजलखान**—तूं रामेश्वर नहीं है. रामेश्वर दौलताबादमें कैसा आयेगा ? तूं झूट बोलता है ? तूंही शिवाजी है !

**काशीबाई**—अहो, हे खरोखरच शिवाजी नाहीत, माझे प्राणनाथ आहेत. मी पदर पसरून विनंती करितें त्यांना सोडून द्या. मला एवढें चुडेदान द्याच.

**फाजलखान**—चूडेलकी अवलाद, चल हट.

**करीमखान**—ए रोती सूरत औरत, तूं, क्यूं बीचमें मेरा चांदभाई करती है ?

**फाजलखान**—क्या, तेरी ऐसी दिल पिघलनेवाली बातें सुनकर, हमारे हाथमें आये हुये इस शिवाजीको छोडकर हम जहागीर डुबायेंगे ?

**काशीबाई**—अहो, पण तुम्ही साप साप म्हणून उगीच दोरखंड बडवितां आहांत! शंभरदां सांगितलं कीं हे शिवाजी नाहींत म्हणून; पण मेल्यांच्या मट्ठ मेंदूंत उतरेल तर शपथ! नका हो, त्यांना माझ्यापासून दूर नेऊं नका. तुम्ही यवन आहांत पण तुमच्यासुद्धां पायां पडतें हवी तर! पण कृपा करून त्यांना पकडून नेऊं नका!

**फाजलखान**—हम कुछ नहीं जानते. यह शिवाजी है. और इसको जबर-दस्तीसे हम ले जायेंगे.

**रामेश्वर**—(स्वगत) गाढवापुढें गीता आणि सत्तेपुढें शहाणपण कुचकामी ठरतें असें म्हणतात तें अगदीं खरें आहे. बरें आहे. एवी तेवी बेतली खरी! आतां ह्यांच्याच तंत्रानें चाललें पाहिजे. (उघड) काय म्हणतां? मी शिवाजी आहें?

**करीमखान**—हां-हां! तूंहि वह बदमाष शिवाजी है.

**रामेश्वर**—तथास्तु! घटकाभर तरी शिवाजी होण्याचा मान मला मिळाला हें एक भाग्यच म्हणावयाचें! नकली शिवाजीला जर इतक्या यातना तर खऱ्याखुऱ्या शिवाजीला या म्लेंच्छांकडून किती त्रास व हालअपेष्टा सोसाव्या लागतील तें परमेश्वरालाच माहीत! (काशीबाईस उद्देशून) अग, हा रामेश्वर आतां राजराजेश्वर शिवाजी झाला आहे. आतां आमचें हें छोटेंसें राज्य आम्ही राणीसाहेबांच्या स्वाधीन करून जात आहोंत आणि हीं अधिकाराचीं वस्त्रं तुम्हांला अर्पण करीत आहोंत. (आपल्या अंगावरचं लुगडं तिच्या अंगावर फेंकतो.) आमची स्वारी परत येईपर्यंत तुम्हीं कोणावरही स्वारी करतां कामा नये. देवदर्शनाच्या निमित्तानें नगरसंचारार्थ राणीसाहेबांनीं बाहेर पडतां कामा नये. नाहींतर राणीसाहेबांवर परचक्राचा घाला पडण्याचें भय आहे. घराच्या किल्ल्याबाहेर मुळींच फिरकूं नका. आलें ना ध्यानांत? मी जातों आतां. जिवंत राहिलों तर परत भेट घडेल, नाहींतर हीच राणी-साहेबांची व राजेसाहेबांची अखेरची भेट समजा. चलावें दादीदीक्षित.

[ काशीबाईखेरीज सर्व जातात. ]

**काशीबाई**—आई जगदंबे! तूंच आतां आमचं रक्षण करणारी! आतां काय बरं करूं? कुणाचे जाऊन पाय धरूं? मी एकटी; त्यांतून बाईमाणूस! कोणत्या उपायानं त्यांची सुटका मला करतां येईल बरं? (विचार करून)

हां-हां चांगली युक्ती सुचली. मीहि त्याच्या पाठोपाठ जातें आणि हे शिवाजी नाहींत अशी त्या मोगल सुभेदाराची खात्री पटवून, माझ्या प्राणपतींना त्या दुष्टांच्या हातून सोडवून आणतें. हो, ठरलं! असंच करायचं! [जाते.]

---

## प्रवेश ३ रा

[ **स्थळ**—घोरपड्यांचा महाल. **सूर्याजी** प्रवेश करतो. ]

**सूर्याजी**—शिवाजीच्या नाशाची मी प्रतिज्ञा केली खरी, पण अजून यशाचें अस्पष्ट चिन्हहीं दिसत नाहीं. दिवसेंदिवस तो प्रबल होत चालला असून त्याला जिंकण्याचें कार्य दुर्घट बनत चाललें आहे. मोऱ्यांचा त्यानें निर्वंश केला असून आम्हां घोरपड्यांचाहि नायनाट करण्याचा त्याचा मनसुबा असल्याची बातमी समजल्यापासून माझें मन खचून गेलें आहे! आदिलशहासुद्धां सर्व मंत्रिमंडळ शिवाजीचा बंदोबस्त कसा करावा ह्या विवंचनेंत आहे. या वेळीं, शिवाजीचा पाडाव करण्यासाठीं टपून बसलेला मोगल बादशहा जर मला वश करून घेता येईल, तर मात्र शिवाजीचा बंदोबस्त माझ्या मनाप्रमाणें होऊन, वर बादशहाकडून मला मोठी जहागीरही मिळूं शकेल. याच वेळीं मी दौलताबादला गेलों असतों; पण त्या चटक-चांदणी शेवंतीनं माझ्या मनाला मोहून टाकल्यामुळें माझे पाय येथून हलत नाहींत. त्या दिवशीं तिचें क्षणभरच कां होईना दर्शन घडल्यापासून तिनें माझ्या हृदयांत कायमचें स्थान पटकावलें आहे. वीज नुसती चाटून गेली तरी शरीर विकल केल्यावांचून रहात नाहीं; त्याप्रमाणें शेवंतीच्या क्षणिक सहवासानें मी अगदीं विव्हल होऊन गेलों आहें! ती मोठी जहांबाज व गर्विष्ठ पोर आहे. ती माझा तिटकारा करते असें मैना म्हणत होती; पण या सूर्याजीपुढं तिचा तो जहांबाजपणा एक क्षणभरहि टिकणार नाहीं! ती बऱ्या बोलानें मला वश झाली तर ठीक; नाहींतर जबरदस्तीनें तिला पळवून नेऊन मी माझी इच्छा पूर्ण करून घेतल्यावांचून राहाणार नाहीं. प्रेमाचा पगडा मनावर बसला म्हणजे मनुष्याला अगदीं बेचैन होऊन जातें म्हणतात, त्याचा आज मला अनुभव येत आहे. बस्स! तें कांहीं नाहीं. आतां शेवंतीच्या प्राप्तीशिवाय दुसरा विचार करावयाचा नाहीं!

**बाजी घोरपडे**—( प्रवेश करून ) नाहीं, शेवंतीचा विचार तूं यापुढें मुळींच करतां कामा नये.

**सूर्याजी**—( आश्चर्यानें ) म्हणजे ! मी हें काय ऐकतों आहें ? बाबा, आपल्या बोलण्याचा अर्थ माझ्या ध्यानांत आला नाहीं.

**बाजी घोरपडे**—बेटा, असा आश्चर्यानें गोंधळून जाऊं नकोस. शेवंतीशीं तुझें लग्न लावण्याचा माझा मानस होता खरा; पण त्या दिवशीं तिनें आमच्या शत्रूची–त्या शिवाजीची–तसबीर आमच्या येथें आणण्याची जी आगळीक केली, त्यामुळं आतां त्या राजद्रोही पोरीला सून करून घ्यायला मी मुळींच तयार नाहीं. तिनं आणलेल्या शत्रूच्या तसबिरीचा जरी आम्ही चेंदामेंदा केला, तरी ती दिवटी एकदां आमच्या घोरपडे घराण्यांत घुसल्यावर, आणि स्वातंत्र्याच्या विषारी धुरानें आम्हां राजनिष्ठांचा वाडा तिनें भारून टाकल्यावर, आमचा जीव कासावीस झाल्याशिवाय राहणार नाहीं.

**सूर्याजी**—पण बाबा, स्पष्ट बोलतों याची क्षमा करा. एका यःकश्चित् स्त्रीच्या भीतीनें आपण एवढे बावरून जातां ? शिवाय, आज जरी शेवंती माथेफिरू असली तरी आपल्यासारख्या राजनिष्ठ घराण्यांत तिचा गृहप्रवेश होतांच तिच्या मुखांतून राजसेवेची पोपटपंची बाहेर पडल्याशिवाय राहणार नाहीं. उगमाशीं गोड भासणारी सरिता, मुखापाशीं सागर–सरितेचा संगम होतांच, आपला गोडपणा सोडून देते.

**बाजी घोरपडे**—प्रत्यक्ष शिवाजीपेक्षांहि, स्वातंत्र्याच्या दुष्ट व पापी विचारांनीं ज्यांचीं डोकीं भडकून गेलीं आहेत, अशा महाराष्ट्रांतील मुलांमुलींचीच आम्हांला अधिक धास्ती वाटते. साक्षात् सूर्यापेक्षां, त्याच्या तापानें तापलेल्या वाळूचा चटकाच अधिक तापदायक असतो.

**सूर्याजी**—(स्वगत) शेवंतीनें माझ्या जिवाला चटका लावून सोडला आहे; तेव्हां बाबांनीं कांहीं जरी सांगितलें तरी शेवंतीला हस्तगत करून घेतल्याशिवाय मी राहणार नाहीं.

**बाजी घोरपडे**—म्हणून म्हणतों, त्या शेवंतीचा नाद तूं सोडून दे आणि शिवाजीच्या नाशाची तूं प्रतिज्ञा केली असल्यामुळें, तूर्त इतर गोष्टींकडे तूं दुर्लक्ष करावेंस हेंच योग्य आहे. शिवाजीच्या बंडाचा बीमोड करणें

हाच सध्यां आम्हा राजनिष्ठ सरदारांच्यापुढें जिव्हाळ्याचा प्रश्न आहे. विजापूर दरबार त्याचें पारिपत्य कसें करावें या फिकीरींत पडला आहे. ह्या वेळीं जर आम्ही त्याचा बंदोबस्त केला नाहीं, तर तिकडे कर्नाटकांत शहाजी जसा शिरजोर बनला आहे, त्याप्रमाणें इकडे महाराष्ट्रांत शिवाजी डोईजड होऊन बसेल आणि सारी आदिलशाही दौलत धुळीला मिळवून, तमाम रियासतीची राखरांगोळी करून टाकील! आणि एकदां विजापूरच्या तख्ताचीं शकलें उडाल्यावर, आम्हां राजसेवकांचे हाल कुत्राही खाणार नाहीं! तेव्हां मालोजी वगैरे सर्व निमकहलाल सरदारांच्या मदतीनें, त्याचा निःपात आम्हांला ताबडतोब केलाच पाहिजे. सूर्याजी, शेवंतीविषयींच्या विचाराला व तिनें पाठविलेल्या वस्तूलाही आमचे येथें यापुढें थारा मिळणार नाहीं.

[ मैना हातांत मखमलीनें मढवलेली एक पेटी घेऊन येते. ]

**मैनावती**—आनंदाची खबर! दादा, आनंदाची खबर!

**सूर्याजी**—मैने, अशी कोणती आनंदाची खबर आणली आहेस? शिवाजीच्या नाशाची कीं शेवंतीच्या प्रेमाची—

**बाजी घोरपडे**—हां सूर्याजी; मीं तुला एकदां बजावलें आहे!

**मैनावती**—दादा, महाराजांच्या नाशाची स्वप्नांतही आशा करूं नकोस. दिव्यावर झडप घालण्याच्या नादांत स्वतःची राखरांगोळी मात्र तूं करून घेशील. हां; शेवंतीबद्दलचे तुझे मनोरथ मात्र पूर्ण होणार असं वाटतं!

**बाजी घोरपडे**—मैने, तुला बजावून ठेवतों कीं, आमच्या वाड्यांत इतःपर शेवंतीबद्दलचा शब्दही कोणी उच्चारतां कामा नये.

**सूर्याजी**—मैने, काय म्हणतेस? माझे मनोरथ पूर्ण होणार? पण ती तर माझा तिटकारा करिते, असें तूंच सांगत होतीस ना? मग भाकड मेघां-पासून माझी तृषा कशी शांत होणार?

**मैनावती**—दादा, मी कांहींतरी बोलत नसून माझ्याजवळ भरपूर पुरावा आहे.

**सूर्याजी**—मग दाखव पाहूं तो पुरावा? म्हणजे माझ्या तळमळणाऱ्या मनाला शांति तरी मिळेल.

**मैनावती**—मी तो पुरावा तुला दाखवीन; पण बाबा मला रागं भरतील ना? ते बघ त्यांनीं डोळे कसे मोठे केले ते मला तर बाई भीतीच वाटूं लागली आहे त्यांची!

**बाजी घोरपडे**--मैने, फाजीलपणा पुरे कर आणि चालती हो पाहूं इथून. ( मैना जाऊं लागते. )

**सूर्याजी**--थांब मैने, जाऊं नकोस. तो पुरावा प्रथम दाखीव व मग जा.

**मैनावती**--आतां बाई मी काय करूं ? बाबा म्हणतात तूं चालती हो नि दादा म्हणतो तूं जाऊं नको. आतां मी करूं तरी काय ? बाबा, तुम्हींच दादाला सांगा, नाहींतर दादा तूं तरी बाबांची समजूत घाल.

**सूर्याजी** – बाबा, माझ्यासाठीं तरी—

**बाजी घोरपडे**--काय पोरांनीं खेळ चालविला आहे हा ? त्यांतून ही मैना तर मोठी अवखळ पोरगी आहे.

**सूर्याजी**--हां, आतां दाखीव पाहूं तो पुरावा.

**मैनावती**--हा बघ तो पुरावा ! ही शेवंतीकडून तुझ्या नांवें नजरभेट आली आहे ! ( पेटी मेजावर ठेवते. )

**बाजी घोरपडे**--काय ? शेवंतीकडून नजरभेट ? उचल अगोदर ती पेटी आणि दूर फेंकून दे.

**सूर्याजी**--पण बाबा, त्या भेटीची व माझ्या नजरेची एकदां भेट तरी होऊं द्या--

**बाजी घोरपडे**--उचल अगोदर ती पेटी; आमच्या शत्रूच्या नादाला लागलेल्या त्या दुष्टेच्या-त्या शेवंतीच्या-भेटीनें आमचा वाडा भ्रष्ट होतां कामा नये. जाळून टाक ती पेटी !

**मैनावती**--पण बाबा--

**बाजी घोरपडे**--एक शब्दही ऐकायला मी तयार नाहीं. बऱ्या बोलानें ती पेटी माझ्या समोरून घेऊन जा. ती नजरभेट माझ्या नजरेआड केली नाहींस, तर पायांखालीं तुडवून तिला धूळभेट घ्यायला लावीन. मैने, उचल ती पेटी.

**सूर्याजी**—( स्वगत ) ती पेटी-माझ्या प्राणप्रियेनें पाठविलेली ती प्रेम-मंजुषा बाबांनीं पायांखालीं तुडविली तर माझ्या प्रेमालाच पायांखालीं तुडविल्यासारखें होणार आहे. पण कांहीं झालें तरी माझ्या प्रेमाची अशी पायमल्ली मी करूं देणार नाहीं.

**मैनावती**—मग दादा, नेऊं ना ही नजरभेट परत ?

**बाजी घोरपडे**—त्याला काय विचारतेस ? घेऊन जा.

**सूर्याजी**—बाबा, कृपा करा, ह्या तुमच्या पुत्राच्या समाधानासाठीं तरी ती पेटी उघडून पाहण्याची मला परवानगी द्या.

**मैनावती**—हो, खरंच बाबा ! दादावर एवढी दया कराच.

**बाजी घोरपडे**—बरें तर; सूर्याजी, पुत्रवात्सल्यामुळें तुझ्या मनाला रंजीस करावें असें मला वाटत नाहीं. पहा ती पेटी उघडून व तुझ्या डोळ्यांचं घे एकदां पारणं फेडून !

**सूर्याजी**—मैने, आण ती पेटी इकडे. (पेटी हातांत घेऊन) यांत काय असेल बरें ? माझ्या प्राणवल्लभेची छबी यांत असेल ? कां माझ्या हृदयेश्वरीच्या नांवाचा जप करण्यासाठीं तिनें एखादी रत्नमाला पाठविली असेल ? कां त्या शिवाजीच्या नाशासाठीं एखादें तीक्ष्ण शस्त्र शेवंतीनें माझ्याकडे धाडिलें असेल ?

**मैनावती**—पण दादा, हातच्या कांकणाला आरसा कशाला ? उघडूनच पहा कीं ! (सूर्याजी पेटी उघडतो. त्यांत कांकणं व आरसा पाहून स्तंभित होतो. )

**सूर्याजी**—यांत तर कांकणें व आरसा आहे ! पण ह्या हातच्या कांकणाला हा आरसा कशाला ? मैने, या वस्तूंचा अर्थ काय ?

**मैनावती**—अरे, त्याचा अर्थ अगदीं स्पष्ट आहे ! तुझा देशद्रोही कलंकित चेहरा या आरशांत पहा आणि तुझ्या शौर्याला साजेसा हा कांकणाचा आहेर तुझ्या अंगावर चढीव. समजलास ?

**सूर्याजी**—(रागानें त्या वस्तू भिरकावून देऊन ) मैने, पुरे कर तुझा फाजीलपणा. स्वतःच्या हातांत कांकणें भरण्यासाठीं नव्हे, तर शेंकडों स्त्रियांच्या हातांतील कांकणें भंग करण्यासाठींच या सूर्याजीचा जन्म झालेला आहे. त्या मिजासखोर शेवंतीनें माझा असा अपमान केला काय ? पण याचा सूड घेतल्याशिवाय मी कधींही राहणार नाहीं. मैने, या सापाच्या शेपटीवर पाय देऊन त्याला चिडविण्याच्या गुन्ह्याबद्दल, तुझ्या मैत्रिणीला जन्माची आठवण राहील हें तूं पक्कं ध्यानांत ठेव. [ जातो.

**बाजी घोरपडे**––मैने, परवांच्या प्रकरणावरून आणि आत्तांच्या वागण्यावरून तुझ्या मनाचा कल आमच्या शत्रूच्या त्या–शिवाजीच्या–पक्षाकडे असल्याचें स्पष्ट दिसत आहे. पण तुला निक्षून बजावतों आहें कीं, यापुढें आमच्या शत्रूशीं संगनमत केल्याचें किंवा त्याच्याविषयीं सहानुभूति बाळगल्याचें माझ्या दृष्टोत्पत्तीस आलें, तर मुलगी वगैरे कांहींएक न पहातां तुझे हालहाल करून तुला ठार करून टाकीन, ध्यानांत ठेव.

**सेवक**—(प्रवेशून) सरकार, मालोजीरावांच्या वाड्याकडे शिवाजी गेल्याची खबर घेऊन हलकारा आला आहे.

**बाजी घोरपडे**—असं? ठीक आहे. जा, प्रथम पागेंत जाऊन मोतद्दाराला पांच घोडे तयार करायला सांग जा. (सेवक जातो.) मालोजीरावांच्या वाड्याकडे शिवाजी कशासाठीं गेला असावा बरें? त्यांना आपल्या गोटांत ओढण्यासाठीं तर तो गेला नसेल ना? पण छे! मालोजीराव कांहीं कच्च्या दिलाचा माणूस नाहीं. आमच्याप्रमाणेंच राजनिष्ठेच्या पक्क्या मुशीतून बाहेर पडलेला तो जातिवंत मराठा आहे. तेव्हां शिवाजीच्या जाळ्यांत तो सांपडेल अशी शंका घेणेंही योग्य नाहीं. उलट, शत्रू मानून शिवाजीला मात्र दग्याफटक्यानें गिरफदार करण्यास तो चुकणार नाहीं. पातशहाच्या खाल्लेल्या अन्नाची चाड बाळगणाऱ्या मालोजीरावांसारख्या मर्द मराठ्यापुढें, त्या शिवाजीचा काय पाड लागणार आहे! ठीक आहे. आतां निवडक जवान बरोबर घेऊन मी मालोजीच्या मदतीस जातों आणि आमच्या शत्रूला शृंखलाबद्ध करून पातशहापुढें हजर करतों. [ जातो.

---

## प्रवेश ४ था

[ **स्थळः**—मालोजीचा महाल. **मालोजी** व **शेवंती** बोलत बसलीं आहेत ]

**मालोजी**––पोरी, तुला माझें म्हणणें ऐकलेंच पाहिजे. बाजी घोरपड्यांच्या पुत्राशीं तुझें लग्न करावें व आपल्या रघूला त्यांची मैना करून घ्यावी, असा फार दिवसांपासूनचा आमचा विचार आहे. आतां हें कार्य दिरंगाईवर टाकावें असें कांहीं मला वाटत नाहीं. मुधोळकरांचा आणि आमचा पूर्वापार ऋणानुबंध पुढेंही कायम टिकावा म्हणून, हा सोयरिकीचा संबंध घडवून आणण्याचें आम्हीं उभयतांनीं ठरविलें आहे. तेव्हां तूं माझ्या

म्हणण्याला रुकार देऊन, म्हातारपणीं मला समाधानाचें सुख द्यावेंस, हें कन्या या नात्यानें तुझें कर्तव्य आहे.

**शेवंती**--बाबा, मी लहानतोंडीं मोठा घांस घेऊन तुम्हांला विचारतें कीं, मुलीचें कर्तव्य जसं आपण मला सांगतां, तसंच पित्याचं कर्तव्य आपण नीट रीतीनं पाळायला नको का? आपल्या रत्नूला मैना करून घ्यायला माझी ना नाहीं, पण मला त्या दुष्टाच्या हाताचा स्पर्शही सहन होणार नाहीं!

**मालोजी**--असें अविचारानें कांहीं तरी बरळूं नकोस. बेटा, सूर्याजी कुल-शीलानें थोर आहे, तसाच तो पराक्रमीही आहे. अशा रूपगुणसंपन्न अनुरूप वराशीं तुझें लग्न लावून, पित्याच्या कर्तव्यापासून मुक्त व्हावें असें मला वाटतें. शिवाय शिवाजीच्या नाशाची त्या वीरशिरोमणि सूर्याजीनें प्रतिज्ञा केली आहे. ईश्वरकृपेनें जर त्याची प्रतिज्ञा पूर्ण झाली, तर त्याचा बडेजाव केवढा वाढेल! सर्व आदिलशाही दौलत त्याच्या पायांवर लोळण घेऊन, सोन्याच्या अंबारींतुन त्याला मुलुखभर मिरवितील. अशा विजयी वीराशीं लग्न लागल्यावर, आमच्या शेवंतीला या म्हाताऱ्याची आठवण तरी होईल का?

**शेवंती**—बाबा, पुरे करा असलीं बोलणीं. तुमच्या या बोलांनीं माझ्या मनाचा तोल सुटून मी कांहीं तरी उणंअधिक बोलून जाईन अशी मला भीति वाटते! या बोलण्यानं माझ्या मनाला आनंद होण्याचं बाजूलाच राहून हृदयाला घरें मात्र पडतात माझ्या!

पद

**नच तोषवी मम मानसाला।**
**विषदिग्ध बोला वदतां कशाला॥ धृ०॥**
**नवप्रेममाला। अधमाधमाला।**
**अर्पील कैसी, कुलवंत बाला॥ १॥**

बाबा, मी स्पष्टच विचारतें, माझें लग्न तुम्ही मला सुख व्हावं म्हणून करणार कीं, मला दुःख देण्यासाठीं?

**मालोजी**--हें काय विचारतेस पोरी? आपल्या मुलींचीं लग्नें, मुलींना सुख व्हावं म्हणूनच प्रत्येक बाप करीत असतो. आपल्या पोटच्या गोळ्याला दुःखार्णवांत लोटणारा उलट्या काळजाचा बाप, ह्या पृथ्वीतलावर कोणी असेल असें मला तरी नाहीं वाटत!

**शेवंती**---पण मला मात्र तशा काळजाचा बाप येथें दिसूं लागला आहे !

**मालोजी**---शेवंती, तुझा शहाणपणा शिवेपार जाऊं लागला !

**शेवंती**---कन्यादान करून मुलीची सासरीं पाठवणी करतांना, बापाच्या डोळ्यांत अश्रू उभे राहातात ते दुःखाचे असतात अशी जनविश्वाची समजूत असते; पण मला तर असं वाटूं लागलं आहे कीं, मुलीचा बाप तें रडण्याचं निव्वळ नाटकच करीत असावा; किंवा आपल्या घरांतली मुलीची घोरपड, दुसऱ्याच्या गळ्यांत अडकवली गेल्यामुळं, त्याच्या डोळ्यांतून आनंदाश्रूच वाहत असावेत. बाबा, मी साफ सांगतें, मी कांहीं त्या नराधमाशीं लग्न लावायला तयार नाहीं.

**मालोजी**---पोरी, जरा विचार कर. माझा हिरमोड करून, या म्हाताऱ्याच्या हृदयाला वेदना होतील असें वर्तन करूं नकोस. तुझ्या वृद्ध पित्याची कांहींच कदर तुला वाटत नाहीं का? हें पान आतां पिकलें आहे; केव्हां गळून पडेल याचा नेम नाहीं! म्हणून म्हणतों माझ्या डोळ्यांदेखत एकदां तुझें लग्न करून टाकावें व लौकरच डोळे मिटावेत, अशी माझी इच्छा आहे, आणि म्हणूनच सूर्याजीला तुझ्यासाठीं मीं वर नेमस्त केला आहे.

**शेवंती**---पण तसला नेमस्त वर मला मुळींच मान्य नाहीं. गुलामगिरीच्या नरकांत लोळणाऱ्या, त्या नीचाच्या नांवानं कुंकू लावायला व चुडे भरायला, कोणती कुमारिका तयार होईल? ही शेवंती, एकाद्या देशभक्त तरुणालाच आपलें तन-मन अर्पण करील! त्या देशकंटक सूर्याजीच्या नांवानं कपाळाला बाशिंग बांधून बोहल्यावर चढण्याची पाळी आली, तर तिथल्या तिथें मी कपाळमोक्ष करून घेईन आणि लाजाहोमांतच माझी आहुति टाकून मोकळी होईन. बाबा, मी जर तुम्हांला इतकी जड झालें असेन, तर मला विष पाजून किंवा माझ्या हृदयांत खंजीर खुपसून मला मारून कां टाकीत नाहीं तुम्हीं?

**मालोजी**---पोरी, असें मर्मभेदक बोलून तूं मात्र ह्या म्हाताऱ्याच्या छातींत एकाच वेळीं शेंकडों खंजीर खुपसते आहेस!

**शेवंती**---हीच जर माझी आई जिवंत असती, तर माझे असे धिंडवडे कां निघाले असते!

**मालोजी**—आतां मात्र माझ्या मनाला ह्या यातना सहन होत नाहींत ! शेवंती, तुझ्या आईच्या मागें तुझें लालनपालन करून मीं तुला वाढविली; तुझी प्रत्येक हौस पुरवून तुला आईची आठवणही होऊं दिली नाहीं. रात्रंदिवस तुझ्या सुखाच्या व कल्याणाच्या विचारांत मीं वर्षेंच्या वर्षें घालविलीं आणि माझ्या जिवापलीकडे तुझी जपणूक केली; त्याबद्दल तुझ्याकडून मला हें बक्षीस मिळावें ना ?

**शेवंती**—बाबा, तुमच्या मनाला दुःख द्यावं असं मला कसं बरें वाटेल ? पित्याच्या प्रेमळ हृदयाला वेदना होतील असं वर्तन, मी जाणूनबुजून का करतें आहें ? ही गोष्ट सोडून आपण मला हवी ती आज्ञा करा. ही शेवंती आपल्या आज्ञेप्रमाणं वागायला एका पायावर तयार आहे. शिवाय बाबा, मी आणखीं एक आपल्याला विनंति करतें कीं, शिवाजीमहाराजांशीं बरकशी धरण्याचा नाद आपण सोडून द्या आणि त्यांच्या पवित्र कार्याला उचलून धरा.

**मालोजी**—पुरे कर पोरी ! आतांपर्यंत तुझें बोलणें ऐकून घेतलें; पण यापुढें एक शब्दही ऐकून घ्यायची माझी इच्छा नाहीं. शेवंती, तूं अलीकडे फारच शेफारून गेली आहेस. तुझ्या अमर्याद वागणुकीची मजल, मला शहाणपणा शिकविण्यापर्यंत गेलेली पाहून, यापुढें तुझी गय करणें शक्य नाहीं. जो दौलतीचा दुष्मन् तो आमचा दुष्मन् ! शिवाजी हा शहाचा शत्रू आहे; अर्थात् आम्हां राजनिष्ठ सरदारांचाही तो शत्रूच म्हटला पाहिजे. त्याला साहाय्य करून आमचीं पिढीजात वतनें बुडवून घ्यावीं आणि भुकेकंगाल का बनावें ? असला मूर्खपणा आम्हीं कधींही करणार नाहीं; आणि शेवंती, तुलाही मी बजावून ठेवतों कीं, त्या शिवाजीच्या भजनीं यापुढें तूं लागतां कामा नये. सूर्याजीशीं लग्न लावायला तूं मुकाट्यानें तयार झालीस तर ठीक आहे; नाहींतर ह्या घराला तुला मुकावें लागेल, ध्यानांत ठेव !

**शेवंती**—त्या नीच कुलांगार सूर्याजीशीं लग्न लावण्यापेक्षां, या घराला मला मुकावं लागलं तरी त्याची पर्वा नाहीं. ह्या गुलामगिरीच्या नरकवासांत आयुष्य कंठण्यापेक्षां, श्रीशिवाजीमहाराजांच्या पुण्याईचे पोवाडे गाऊन महाराष्ट्रांतील घरनूघर मी जागं करीन आणि जोगीण बनून कालक्रमणा करीन. बाबा, मी तुम्हांला अखेरचं निक्षून सांगतें कीं, तुम्ही मात्र बाजी घोरपड्यांच्या नादानं स्वतःचा घात करून घेत आहां ! पण ह्याचा परिणाम कांहीं चांगला

होणार नाहीं खास. अखेरीस तुमच्या साऱ्या खटपटी वायां जाऊन, तुम्हांला शिवाजी महाराजांचेच पाय धरावे लागतील. हें माझं वचन कालत्रयीं खोटं होणार नाहीं ! [ जाते.

**मालोजी**--ह्या शिवाजीनें केवळ देशांतील तरुणांनाच नव्हे, तर आमच्या सारख्या बादशाही मनसबदारांच्या मुलींनाही बंडखोर बनविलें आहे ! आणि एकदां स्त्रिया बंडखोर बनल्या, म्हणजे त्या बंडाचा मोड करण अवघड होऊन अखेर शत्रूपुढें शरणागतीचा मार्ग पत्करावा लागतो. तर काय, शिवाजीची स्वातंत्र्याची चळवळ यशस्वी होऊन, अखेर आदिलशाही तख्ताला त्याच्यापुढें मुजरा करण्याचा प्रसंग येणार ?

**सेवक**—( प्रवेश करून ) शिवाजीमहाराजांची स्वारी येत आहे.

**मालोजी**—कोण, शिवाजी ? आणि अवचित आमच्या घरीं त्याचें आगमन ! शत्रू समजून त्याची मुलाखत न घेतांच परत पाठवून देऊं का ? ( विचार करून ) पण तसें नको ! तो कशासाठीं आला आहे हें मला समजून घेतलेंच पाहिजे. अरे, जा, त्याला आंत पाठवून दे. [ सेवक जातो. **शिवाजी** प्रवेश करतो. ] सुस्वागतम् ! सुस्वागतम् ! महाराष्ट्राचे राजे व हिंदुपदपादशहा शिवाजी भोंसले, सुस्वागतम् ! (शिवाजी वंदन करतो.) छे छेः ! आमच्यासारख्या पाप्यांच्या पायांवर डोकें ठेवणें आपल्यासारख्या स्वतंत्र राजाला शोभत नाहीं.

**शिवाजी**—आपण मला शहाजीराजांच्या ठिकाणीं आहांत. इतकेंच नव्हे तर महाराष्ट्रांतील प्रत्येक वृद्ध मराठा, मला माझ्या पित्याप्रमाणें पूज्य व वंदनीय वाटतो.

**मालोजी**--( स्वगत ) किती थोर आणि उमद्या दिलाचा मनुष्य आहे हा! (उघड) बरें, मुद्दाम आमच्या येथें पायधूळ झाडण्याचें कारण ?

**शिवाजी**-- आपण बाजी घोरपड्यांच्या नादीं लागून, आमच्या स्वराज्याच्या उद्योगाला अडथळा करण्याचें व जुलमी सत्तेला बळकटी आणण्याचें, आत्मघातकी धोरण स्वीकारलें असल्याची खबर माझ्या कानीं आली. ती खरी आहे काय ?

**मालोजी**—होय. ईश्वरी संकेतानें स्थापित झालेल्या पातशाही सत्तेविरुद्ध तूं जी बंडाळी चालविली आहेस, ती मोडून टाकून तुझ्यासह सर्व राजद्रोही

बंडखोर सरदारांना नामशेष करून टाकावें आणि इतकेंच नव्हे तर या बंडखोर वृत्तीचाच बींमोड करून टाकावा असें आम्हीं ठरविलें आहे.

**शिवाजी**--पण ही वृत्ति कोणत्याही बाह्य उपायांनीं कधींच नाहींशी होणार नाहीं. जुलुमाच्या व जबरदस्तीच्या पायांवर उभारलेली सत्ता क्षणार्धांत कोसळून पडत असतें ! आज अदिलशाहाचें सिंहासन डळमळूं लागलें आहे आणि असल्या डळमळीत सिंहासनाला आधार देण्याचा तुम्हीं कितीही प्रयत्न केला, तरी त्याचा तोल सावरला जाणार नाहींच; पण उलट तुमचा मात्र त्याच्याखालीं चुराडा उडाल्याशिवाय राहणार नाहीं. मरणोन्मुख झालेल्या सुलतानी सत्तेला गिळून टाकण्यासाठीं, दिल्लीचा मोगली मगर टपून बसला आहे. अशा वेळीं सर्वस्व गमावून बसणें बरें कीं, आपलें स्वतंत्र मराठी राज्य स्थापून त्याला प्रतिस्पर्धी सत्ता निर्माण करणें बरें, याचा आपण विचार करा.

**मालोजी**—पण आमच्या म्हाताऱ्या मनाला हे तुमचे विचार मुळींच रुचेत नाहींत. आम्ही सुलतानाचे सरंजामी सरदार ! पातशहाची चाकरी इमानेंइतबारें बजवावी आणि आपल्या शौर्याचे सार्थक करावें, एवढेंच आम्हांला समजतें. शहाजीराजांनींसुद्धां राजसेवेचा हाच सीधा मार्ग पत्करून उत्तम यश संपादन केलें. त्यांना सर्व प्रकारची अनकूलता असूनही, त्यांनीं कधीं आपल्या अन्नदात्यावर शस्त्र उगारण्याचा वेडेपणा केला नाहीं. काय आश्चर्य आहे पहा ! ज्या वृक्षाला बागानें खतपाणी घालून वाढविला व त्याची जोपासना केली, त्याच वृक्षाच्या मुळांवर मुलानें कुऱ्हाड घालण्यास उद्यक्त व्हावें ! शिवाजी, अरे, तुझ्या ह्या वर्तनानें तूं आपल्या वडिलांच्या कीर्तीला कालिमा आणतो आहेस बरें कालिमा !

**शिवाजी**--नाहीं—महाराज, नाहीं ! उलट माझ्या कृतीनें माझ्या वडिलांची कीर्ति मी उज्ज्वल करीत आहें. इतकेंच काय, पण सर्व मराठ्यांनीं उज्ज्वल कीर्तीनें ह्या देशांत सदैव नांदावें, म्हणूनच माझा एवढा अट्टाहास चाललेला आहे; एवढ्याचकरितां आपल्या पायांपाशीं मी अशी विनंती करण्यासाठीं आज आलेला आहें कीं, आपण सांप्रत जो देशोच्छेदनाचा विपरीत मार्ग धरला आहे, तो सोडून आमच्या पक्षांत सामील व्हा. आज तुमची तलवार, जी स्वबांधवाकडे रोखलेली आहे, ती फिरवून शत्रूकडे तिचा

मोर्चा वळवा, म्हणजे आपल्या आयुष्याचें खरें खरें चीज होईल व मायभूमीचे पांग फेडल्याचें श्रेय आपणांस मिळेल! तेव्हां राजसेवेचा निंद्य मार्ग सोडून आमच्या कटांत आपण सामील झाल्यास--

**मालोजी**—बस् बस्! धडधडीत धन्याशीं निमकहरामी करायला तूं मला सांगतोस ? मी ही गोष्ट कधींही मान्य करणार नाहीं. मालकाशीं विश्वासघात केला तर इहपरलोकीं माझी छीःथूः झाल्याशिवाय राहणार नाहीं! पातशहाचें अन्न आम्ही खातों; तेव्हां पातशाही विरुद्ध शस्त्र धरण्याची कल्पनाही आम्हां राजनिष्ठ सरदारांच्या मनालाशिवत नाहीं. शिवाजी, मी तुला निक्षून सांगतों कीं, अस्सल मराठा आपल्या धन्याशीं बेइमान कधींही होत नाहीं!

**शिवाजी**--आणि त्याचबरोबर अस्सल मराठा, जुलमी व अन्यायी राजाला आपलें इमान विकीत नसतो! तुमच्या ह्या आंधळ्या राजनिष्ठेनें, तुमच्या देशबांधवांचें दुःख दुणावीत आहांत हें तुमच्या लक्षांत कसें येत नाहीं ? महाराज, तुमची शौर्याची समशेर शत्रूचा कंठच्छेद करायची, तें बाजूला राहून मित्रांच्या मानेवर पडत आहे हें आपणांस दिसत नाहीं का ? मायभूमीच्या पायांतील पारतंत्र्याची शृंखला आपण आपल्या कृतीनें अधिक घट्ट आवळीत आहांत हें आपण जाणत नाहीं असें मी कसें म्हणूं! महाराज, विचार करा. मी हात जोडून विनंति करतों; म्हातारपणीं तरी आपल्या देशबांधवांचे शिव्याशाप घेऊन ह्या आपल्या पांढऱ्या केसांना काळिमा फांसून घेऊं नका!

**मालोजी**--पण क्षणभर असें मानलें कीं, आम्ही तुमच्या पक्षाला येऊन मिळालों; तरी पण त्यापासून आमचा काय फायदा होणार ? आदिलशाही नाहींशी होऊन शिवशाही किंवा भोसलेशाही सुरू होईल! सर्व मराठा मंडळांत आपलेंच वर्चस्व नेहमी राहावें आणि सर्वांनी आपल्याच हुकमतींत वागावें, ह्या स्वार्थबुद्धीनें तूं ही सारी खटपट चालविली आहेस हें काय आम्हांला समजत नाहीं ?

**शिवाजी**—छे छे:! महाराज, यांत स्वार्थबुद्धीचा लवलेशाही नाहीं. केवळ स्वदेश आणि स्वधर्म यांच्या रक्षणासाठींच मी हातांत शस्त्र धरलेलें आहे; आणि भवानीमातेच्या आशीर्वादानें आतांपर्यंत मला माझ्या कार्यांत उत्तम

यशाही मिळत आलें आहे. यवनांनीं जर रयतरजावंतीनें राज्य केलें असतें, तर स्वतंत्र राज्य स्थापण्याचें आम्हांला कारणच नव्हतें. पण प्रजेच्या कल्याणापेक्षां तिच्यावर जुलूम जबरदस्ती करण्याचाच ज्या सत्तेनें आजपर्यंत प्रयत्न केला, त्या सत्तेला धुळीला मिळवून स्वतःच्या पायांवर उभें राहण्याचा व आपला कारभार आपणच करण्याचा, स्वावलंबनाचा मार्ग माझ्या देशबांधवांना मीं दाखविला, तर आपल्या सारख्यांनीं त्याच्यावर स्वार्थीपणाचा शिक्का मारून, आपली क्षुद्रबुद्धि दाखवावी हें पाहून मनाला फार वाईट वाटतें! महाराज, आपल्यासारख्या विचारी वृद्धानें असें बोलणें शोभत नाहीं.

**मालोजी**—पण तुझ्या स्वराज्याची तरी शाश्वती कशी पटावी आमच्या मनाला? आज सहा हजारांची मनसब व बारा लाखांची जहागीर पातशाहाकडून आम्हांला मिळत आहे. मग हातचें सुख गमावून पळत्या प्रतिष्ठेच्या मागें लागण्यांत काय अर्थ आहे? शिवाजी, मीं मागेंच तुला शिवापूरच्या भवानीच्या मंदिरांत बजावलें आहे कीं, हा आगीशीं खेळ खेळण्याचा आत्मघातकी नाद तूं सोडून दे आणि आमच्याप्रमाणें हूजूरची चाकरी करून उत्तम लौकिक मिळव. तुझ्या त्या स्वराज्यांत--

**शिवाजी**—महाराज, स्वराज्य माझें एकट्याचें नसून सर्व महाराष्ट्राचें आहे. स्वराज्यांत केवळ भोंसल्यांच्या नौबती झडणार नसून, प्रत्येक हिंदपुत्राच्या मस्तकावर स्वराज्याचा कुंकमतिलक झळकणार आहे. महाराज, आपण जर आमच्या पक्षाला मिळालांत, तर आपण म्हणाल ती वस्तु मी आपल्यापुढें आणून हजर करीन. इतकेंच काय, पण आमच्या गोटांत येण्याचें जर आपण मला वचन देत असाल, तर आजपर्यंत कमावलेले किल्ले, कोट, खजिना व फौजेसह सर्व स्वसंपादित स्वराज्य आपल्या चरणांवर अर्पण करण्यास हा शिवाजी तयार आहे.

**सेवक**—( प्रवेश करून ) महाराज—महाराज, शेवंतीताईसाहेबांना सूर्याजी घोरपड्यानें जबरदस्तीनें घोड्यावर घालून पळवून नेलें!

**मालोजी**--( क्रोधानें ) काय! माझ्या मुलीला त्या सूर्याजीनें पळवून नेली? त्याच्याशीं शेवंतीचें लग्न करण्याचा माझा विचार होता; पण तिच्यावर बलात्कार करून तिला त्यानें पळवून नेली, ह्याचें प्रायश्चित्त त्याला

दिल्याशिवाय मी राहणार नाहीं. आतां त्या नराधमाचें माझ्या तरवारी-शींच लग्न लावून टाकतों ! कोण आहे रे तिकडे ? —

**शिवाजी**—महाराज, आपण स्वस्थ रहा ! आमच्यासारखे तरुण जिवंत असतांना, आपल्यासारख्या वृद्धांना शीण देणें आमच्या शौर्याला शोभणार नाहीं. आमच्या आयाबहिणींवर आमच्याच लोकांकडून जुलूम होत असतां, माझी समशेर म्यानांत स्वस्थ कशी बसून राहील ? तुमचा रघूजी जर येथें असतां, तर तो जितक्या आवेशानें व त्वेषानें आपल्या बहिणीच्या रक्षणासाठीं धांवून गेला असता, तितक्याच त्वेषानें व आवेशानें हा शिवाजी निघाला पहा. महाराज, आपण बिलकुल काळजी करूं नका; थोड्याच वेळांत त्या दुष्टाचें पारिपत्य करून, आपल्या मुलीला सोडवून आपल्या चरणांशीं हजर होतों. ( जाऊं लागतो. )

**मालोजी**--थांब. शिवाजी, थांब. माझ्यासारख्या शत्रूच्या मुलीला संकटांतून सोडविण्यासाठीं तूं इतक्या उत्कंठेनें निघालास, त्या अर्थी तूं खरोखरच थोर महात्मा आहेस यांत शंका नाहीं ! तेव्हां तुझ्या पुण्यपावन चरणांवर मला माझें मस्तक ठेवूं दे. ( पायांवर मस्तक ठेवतो. )

**शिवाजी** —छे—छे ! महाराज, हें काय ?

**मालोजी**--शिवाजी, तुझ्या चरणांवर हात मारून मी तुला वचन देतों कीं, हा मुसलमानांचा मनसबदार आजपासून स्वराज्याचा शिलेदार झाला आहे. यापुढें माझीं हीं म्हातारीं हाडें स्वराज्याच्याच कामीं उपयोगी पडतील !

**शिवाजी**--अहाहा ! आपल्या ह्या शब्दांनीं मला किती आनंद झाला म्हणून सांगूं ! पण अगोदर मला शेवंतीच्या सुटकेकारितां गेलें पाहिजे.

[ जातो. ]

**मालोजी**—लोखंडाच्या तुकड्यानें परिसाला लोखंड बनविण्याचा हट्ट धरावा आणि अखेर स्वतांच्याच जिवाचें सोनें करून घ्यावें, तशीच माझी स्थिति झाली आहे. शिवाजीला गुलामगिरीच्या नरकांत ओढण्याचा मी प्रयत्न करीत असतां त्यानें उलट मला स्वराज्याच्या स्वर्गांत नेलें ! सत्पुरुष आपल्या प्रभावानें सर्व सृष्टीला आपल्या कह्यांत आणतात, असें जें म्हणतात त्याचा आज मला अनुभव येत आहे. शेवंती, तूं मला वारंवार बजावीत होतीस; पण माझ्या मूढ व अविवेकी मनाला तुझें म्हणणें पटत

नसे. पण आतां मात्र माझे डोळे उघडले! अखेर शिवाजीच्या पायांचा तुम्हांला आश्रय घ्यावा लागेल, हे तिचे शब्द अगदीं तंतोतंत खरे ठरले. आज माझ्या मनाला किती आनंद होतो म्हणून सांगूं! नवजीवन प्राप्त व्हावें त्याप्रमाणें आज मला वाटत आहे. त्या दुष्टबुद्धि घोरपड्यांच्या नादीं लागून मी आजपर्यंत वाट चुकलेल्या वाटसरासारखा कुठें तरी भटकत होतों; पण शिवाजीनें मला योग्य मार्गावर आणलें व माझा अधःपात टाळला. आतां बाजी घोरपड्याला मी साफ सांगणार कीं, तुमची आमची दोस्ती यापुढें संपली. [ बाजी घोरपडे कांहीं शिपायांसह प्रवेश करतो. ]

**बाजी घोरपडे**—कुठें आहे तो आमचा हाडवैरी शिवाजी? मालोजीराव, आतां इतक्यांत शिवाजी भोंसला येथें होताना? मग इतक्यांत तो कुठें गेला?

**मालोजी**—त्या नीच सूर्याजी घोरपड्याच्या नरडीचा घोट घेण्यासाठीं तो आतांच गेला.

**बाजी घोरपडे**—पण त्याला तुम्हीं जाऊं कसें दिलेंत? शत्रू आयता हातांत सांपडला असतां—

**मालोजी**—शिवाजी माझा शत्रू नसून मित्र आहे!

**बाजी घोरपडे**—( आश्चर्यानें ) काय? शिवाजी तुमचा मित्र आहे? मालोजीराव, शुद्धीवर आहांत का तुम्ही? कीं तुम्हांला म्हातारचळ लागला आहे?

**मालोजी**—मी पूर्ण शुद्धीवर आहें! मला म्हातारचळ लागला नसून तुम्हांला मात्र शिवाजीचळ लागला आहे आणि म्हणून शिवाजीच्या नुसत्या नांवानें तुम्ही चळचळां कांपूं लागलां आहांत!

**बाजी घोरपडे**—तुमच्यासारखीं म्हातारीं मढीं शिवाजीच्या नांवानें भेदरून जातील; पण या राजनिष्ठ आणि पराक्रमी बाजीच्या हृदयाचा फत्तर अभेद्य आहे समजलांत! शत्रूशीं संगनमत करून आपल्या राजाशीं फंदफितुरी करतां आणि धन्याशीं निमकहरामी करतां याची तुम्हांला शरम नाहीं वाटत? राजद्रोहाच्या पातकाबद्दल प्राणाला मुकावें लागेल हें समजत नाहीं तुम्हांला? पातशहाच्या तख्ताशीं इमानी राहण्याची तुम्हीं घेतलेली शपथ मोडून उघड उघड बंडखोर बनतां?

**मालोजी**--होय. मीं जाणूनबुजून हा मार्ग पत्करला आहे. पातशहाच्या तख्ताचा बोज आतां राहिला आहे कुठें? अन्यायी व अधर्मी सत्तेच्या जुलमी कारभाराला साहाय्य करणें, म्हणजे परमेश्वराच्या घरीं भयंकर गुन्हेगार ठरणें होय.

**बाजी घोरपडे**--पण आपला राजा अन्यायी आहे कीं जुलमी आहे याचा आम्हीं राजनिष्ठ सरदारांनीं मुळींच विचार करतां कामा नये. बादशहाचा हुकूम अक्षरशः पाळणें एवढेंच आपलें कर्तव्य. मालोजीराव, अजून शुद्धीवर या आणि हा वाममार्ग सोडून, राजनिष्ठेचा राजमार्ग अवलंबून, स्वामिसेवेचें चीज करा. पण त्या शिवाजीच्या नादानें वागण्याचाच तुमचा हैवान हट्ट जर ह्यापुढें चालणार असेल, तर ह्या तुमच्या भयंकर अपराधाबद्दल शासन करायला, या बाजीची ही स्वामिनिष्ठ समशेर तयार आहे.

**मालोजी**--शिवाजीसारख्या सत्पुरुषाशीं स्नेह करण्याच्या गुन्ह्याबद्दल, जर बादशहा मला हत्तीच्या पायीं चिरडून मारणार असेल, तर त्याची मी मुळींच क्षिति बाळगीत नाहीं. स्वदेशाची सेवा करणें हा जर राजद्रोह ठरत असेल, तर असल्या अपराधाबद्दल एकदां नव्हे तर हजारदां फांसावर लटकण्यास मी तयार आहें. बाजी, मी तुम्हांला स्पष्ट बजावून ठेवतों कीं, शिवाजीशीं शत्रुत्व करून तुम्ही देशद्रोहाचें भयंकर पातक करतां आहांत. हा देशद्रोह शहाण्णव कुळ्यांना काळिमा फांसून, अक्षय नरकांत खितपत पाडायला लावतो हें ध्यानांत ठेवा.

**बाजी घोरपडे**--अस्सं काय? ठीक आहे. शिवाजीला फितूर झाल्याच्या गुन्ह्याबद्दल हा बादशहाचा स्वामिनिष्ठ सरदार बाजी घोरपडे, तुम्हांला कैद करीत आहे. शिपाई हो, पकडा या हरामखोराला!

[ शिपाई त्याला पकडतात. ]

**मालोजी**--बाजी, तुझ्यासारख्या पाजी माणसाचा स्नेह केला, भल्याबुऱ्या कामांत तुला साहाय्य केलें त्याची चांगली स्मृति राखलीस! पण अधमा, तुला शेवटचें बजावून ठेवतों कीं, फुंकर घातल्यानें दिवा विझून जात असेल; पण त्याच फुंकरानें निखारा मात्र अधिक प्रज्ज्वलित होतो. तुझ्या नीच कृतीनें ह्या मालोजीच्या जीविताचा नाश झाला तरी तो महाराष्ट्राचा राजा शिवाजी, ह्याचा मोबदला तुला दिल्याशिवाय रहाणार नाहीं! ( पडदा पडतो.

# अंक दुसरा



## प्रवेश १ ला

**स्थळः**---दौलताबाद. रामेश्वर मुसलमानी वेषांत **रहीमबक्ष** बनून येतो.]

**रहीमबक्ष**--'पुरुषस्य भाग्यम्' म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. केवळ धर्मांतराबरोबर केवढें स्थित्यंतर झालें माझ्यांत! पूर्वी शेंडींतला एक केंस कमी झाला तर आयुष्यांतील एक संवत्सर कमी झाल्यासारखें वाटे आणि दाढीला तर नेहमींच सोडचिठ्ठी मिळत असे. पण आतां मनू पालटला. आतां दाढीचें राखीव खातें आमच्या ताब्यांत असून, शेंडीचे सोंपीव खातें हजामाच्या सुपूर्त केलें आहे. दाढी ही पतिव्रता स्त्रीसारखी पुरुषाबरोबर अहोरात्र नांदत असते, तर शेंडी वारांगनेसारखी वाऱ्यावर वावरत असते. आतां आपली शेंडी दुसऱ्याच्या हातांत जाण्याचें भय उरलें नाहीं! उलट, दुसरे लोक मात्र माझी दाढी खाजविल्याशिवाय राहणार नाहींत! आमच्या त्या बंडीआंगरख्याच्या पोशाखापेक्षां हा पेहराव किती रुबाबदार आहे! बाकी ह्या बेट्यांची जातच मोठी मिजासी व चैनी! मियासाहेबांच्या मुखांत विडा आणि कानांत केवडा नाहीं असें कधींच व्हावयाचें नाहीं! (कानांतील अत्तराचा वास घेतो.) मी सर्व जन्म भिक्षुकी करण्यांत घालविला असता, तरी आज जें सुख व जो मानसन्मान मिळत आहे, तसा जन्मांत कधींही मिळाला नसता. खानसाहेबांची माझ्यावर मेहेरनजर असल्यामुळें मला ते माझ्या कैलासवासी बापापेक्षांहि वंदनीय वाटतात! आतां मी रामाचा भक्त नसून रहीमचा बंदा बनलों आहें. पूर्वी तेहतीस कोटी देवांची आळवणी केली तरी एकही नवसाला पावण्याची पंचाईत; तर आतां एकाच खुदाच्या खुशामतीनें आमचा मतलब साधला जातो. मी हिंदूच राहिलों असतों तर एकादी लहानशी वतनवाडी मोठ्या मुष्किलीनें मला मिळाली असती; पण आतां मी मुसलमान झाल्यामुळें खानाची सुभेदारीच नव्हे तर दिल्लीच्या तख्तावर डोळा ठेवायला मला कांहींच हरकत नाहीं! (आरसा काढून त्यांत चेहरा पहातो.) खरेंच! माझा पूर्वींचा तो ओबडधोबड रांकट चेहरा, ह्या

दाढीमिशांच्या महिरपीनें कसा गुल्जार दिसूं लागला आहे ! तसेंच ह्या घोळदार चोळण्यानें व ह्या किनखापी शेरवानीनें मी कसा शेरासारखा डौलदार दिसूं लागलों आहें. माझ्या कमरेची ही समशेर मात्र शेराला सवाशेर व्हावी तशी मला झाली आहे ! तशीच ही डोक्यावरची होडीवजा पगडी मला डोईजड झाली आहे ! माझा धर्म बदलला, नांव बदललें, वेषही बदलला; आतां मला माझी काफिरी भाषा बदलून आमच्या राज्यकर्त्यांचीच बोली उचलली पाहिजे. ' न वदेत् यावनीं भाषाम् ' या सूत्रालाही माझ्याबरोबर धर्मांतर करायला लावतों. आयीए जनाब ! तशरीफ लायीए. आलेकम रामराम !

[ फाजलखान व करीमखान येतात. ]

**करीमखान**—बंदगी–रहीमबक्ष, बंदगी !

**फाजलखान**—क्यौं रहीमबक्ष, कैसी क्या तेरी हालहवाल है ?

**रहीमबक्ष**––हाल तो गुजर गये, और मै हवालदार बनलों आहें सध्यां ! दोस्तांनो, तुमच्याच गाढवपणामुळें आजचा हा सोन्याचा दिवस उगवला. पण हें पहा, माझ्याशीं जरा अदबीनेंच वागत जा. मी कोण आहें, माझा दर्जा काय आहे, याची तुम्हांला माहिती मालुम नहीं क्या ?

**करीमखान**—म्हणजे ? तूं असा कोण रे तिस्मारखान बनला आहेस ?

**फाजलखान**––करीमभाई, यह रहीम बिलकूल बेवकूब है !

**रहीमबक्ष**––हां ! फाजल, गाली नहि देना ! मी कोण आहें ? नवाबजादा जी हुजुरखां रहीमबक्षसाहेब ! मी जर रागावलों तर नौकरीला मुकावें लागेल तुला ! खानसाहेबांपाशीं माझें फार वजन आहे. मी बडा हुद्देदार ! माझ्यापुढें तुझ्या पांढऱ्या दाढीची मातब्बरी चालायची नाहीं. अच्छा करीम, तूं मेरा जानी दोस्त. तूं आमचें एक काम कर.

**करीमखान**—हां–हां ! जरूर ! कहोतो सही.

**रहीमबक्ष**––हें पहा, आपल्याला आतां सर्व प्रकारचें सुख व सन्मान मिळाला आहे; पण या सर्वांत बायकोची उणीव आहे. मुझे औरत चाहिये. हुद्दा मिळाला कीं, हुकमत गाजवायला हक्काचें माणूस पाहिजे असतें ! आपल्या वरिष्ठानें दिलेल्या लाथा, घरांत बायकोवर झाडाव्या

लागतात हें तुला ठाऊक नाहीं. म्हणून म्हणतों आपल्याला औरत आणून दे.

**करीमखान**--आतां कुणाची औरत आणून द्यावी ! कोण आपली बायको तुला देणार ?

**रहीमबक्ष**--ए पागल, दुसऱ्याची बायको मला नको आहे ! माझी मला चाहिये.

**फाजलखान**—ए करीम, उस्को औरत नहि चाहिये ! उस्को बेटी चाहिये बेटी !

**करीमखान**—अरे पण बेट्या ! तुझी बेटी देऊन टाकतोस का याला ! पहा; फक्कड जांवई आहे ! तुझ्या बेटीला कांहीं कमी पडूं द्यायचा नाहीं हा आमचा दोस्त ?

**रहीमबक्ष**—हो-हो, तुमच्या लडकीला अगदीं हातांतल्या लकडीसारखी मी संभाळीन. ती दमलीभागली कीं, माझ्या दाढीनें माझ्या लाडकीला मी वारा घालीन ! ती जर फार नाचरी असेल तर तिच्याभोंवतीं अष्टौप्रहर नाचत राहून मी पक्का प्रेमीपागल बनलों आहें असें तिला जाणवीन ! तिचें सौंदर्य मला सदैव लुटावयास मिळावें, म्हणून मी अहोरात्र तिच्या गोषांतच गुजारा करीन ! मग काय फाजलभाई, देतां ना तुमची बेटी मला ?

**फाजलखान**—अबे जा ! तेरे सरीखे बम्मनको मेरी खुपसूरतबला कभीभी नहिं मिलेंगी ! मेरी बेटी मैदानकी मट्टी नही है !

**रहीमबक्ष**—काय, तुमच्या मुलीशीं निका लावायला मी निकामी ठरलों ? बजाजी निंबाळकर बाटून मुसलमान बनतांच, खुद्द शहाजादीशीं त्यांची शादी झाली; मग माझ्यासारख्या बाटग्याला तुमच्यासारख्या बजरबट्टूची बेटी कां मिळूं नये ?

[ काशीबाई येते. ]

**काशीबाई**—माझे प्राणनाथ कुठं आहेत ? मीं त्यांना परोपरीनें विनविलं पण त्यांनीं कांहीं ऐकलं नाहीं माझं , अन् शेवटीं परधर्माचा अंगीकार केलाच त्यांनीं ! आतां मी काय करूं ! त्यांना कुठं शोधूं ? त्यांना शोधून काढून श्रीसमर्थांच्या चरणांवर घालून शुद्ध करून पुन्हां आपल्या धर्मांत

घ्यावं, असं एकसारखं माझ्या मनांत येतं; पण त्यांचा शोध लागल्यावरच्या सर्व गोष्टी ! मी एकसारखी त्यांना धुंडतें आहें !

**रहीमबक्ष**—( स्वगत ) ही ब्रह्महत्या इथेंही आलीच का ? आतां हिला ओळखच देतां कामा नये !

**काशीबाई**—( रामेश्वरास ) अहो, माझे प्राणेश्वर कुठं आहेत ?

**रहीमबक्ष**—तुमचे प्राणेश्वर रामेश्वराच्या यात्रेला गेले असतील !

**काशीबाई**—नाहीं हो, रामेश्वराच्या यात्रेचं पुण्य त्यांच्या नशिबीं नाहीं. ते मुसलमान झाले आहेत.

**रहीमबक्ष**—असें का ? तर मग ते मक्का-मदिना करायला गेले असतील ! तुम्हीं असें करा; दाभोळ बंदरावर जाऊन त्यांची चौकशी करा.

**काशीबाई**—छे हो ! इतक्या दूरच्या प्रवासाला ते कसचे जाणार ! ते इथंच कुठं तरी असले पाहिजेत.

**करीमखान**—( हळूच ) रहीमबक्ष, सांगूं का तूं इथेंच आहेस म्हणून ?

**रहीमबक्ष**—हळूच, चूप बैस ! तसला मूर्खपणा करूं नकोस. अरे बाबा; मी इथेंच आहें असें जर हिला कळलें, तर ही महिषासुरमर्दिनी माझ्या दाढीला धरून मला फरपटत ओढीत नेईल व माझेंच मर्दन करील.

**करीम**—अहो बाई, आपला पति सांपडत नाहीं म्हणून चिंता करूं नका तुम्ही. तुम्हांला पाहिजे तितके पति मी पाहून देईन !

**काशीबाई**—ए पशुपति, पुरे कर तुझा पाजीपणा !

**रहीमबक्ष**—आपण रागावूं नका. पति परदेशी झाला म्हणजे पुष्कळ बायका पिसाटासारख्या करूं लागतात हें मला माहीत आहे. आपणां सर्वांचे प्राणेश्वर म्हणजे दिल्लीश्वर ! ‘दिल्लीश्वरो वा जगदीश्वरो वा’ हें तत्त्व तुम्हांला माहीत नसेल कदाचित्. तेव्हां दिल्लीचा मार्ग तुम्ही धरा.

**करीमखान**—जनाब, देहली तो बहोत दूर है !

**रहीमबक्ष**—कुछ फिकीर नहीं ! दिल्लीचा पल्ला दूर असेल, तर अगदीं नजीकचा मार्ग सांगतों. सुभेदार मोहबतखानसाहेबांच्या जनानखान्यांत तुमची सोय अवश्य लागेल. गेल्या वर्षीच्या वाल्याच्या वावटळींत खानसाहेबांच्या जनानखान्यांतलीं बरीचशीं पांखरें खतम झालीं त्यामुळें

जनातखान्यांतले कित्येक मंचक रिकामे पडले आहेत. तेव्हां तुमची वर्णी तिथें खास लागेल !

**करीमखान**--बरें तेंही पसंत नसेल, तर आणखीन् अगदीं नजीकचें ठिकाण दाखवतों हवें तर.

**रहीमबक्ष**--तें कोणतें ?

**करीमखान**--हा आपला फाजलभाई, आणखी दुसरें कोण ? आतां तो बुड्ढा आहे एवढेंच. पण त्याच्यासारख्या बुड्ढया घोड्याला ही लाल लगाम चांगली शोभेल ! (फाजलास) कां, खरें कीं नाहीं ? (फाजल खुलून जातो)

**रहीमबक्ष**—मोरानें पिसारा उभारला. आतां नाचायला न लागो म्हणजे मिळविली !

**करीमखान**—पहा कसा खुललाय म्हातारा ! मग फाजलभाई, कसें काय ? तें माषूक मनीं भरतंय का तुमच्या ?

**फाजलखान**—हां-हां, जरूर-जरूर ! इस माषुकने तो मुझे मार डाला ! प्यारी ! (जवळ जातो.)

**काशीबाई**—दूर हो खुरासानी खोंडा ! (फाजल धडपडून मागें सरतो.)

**करीमखान**--धूत तेरी ऐसी तैसी ! प्यारीने कैसी बताई खुमारी ! ठेरो. तेरे वास्ते मैं कोशिस करता हूँ ! (काशीबाईस) हें पहा, तुम्ही कांहीं काळजी करूं नका. तुमचा पति लौकरच तुमच्या स्वाधीन करण्याची मी हमी घेतों.

**रहीमबक्ष**--(स्वगत) आं ! ये क्या गडबडघोटाळा ! छे, छे, छेः ! स्त्री-चरित्र बुद्धिभ्रंश करणारें असतें म्हणतात तेंच खरें ! पण जाऊं द्या. त्या मागील गोष्टींनीं जिवाला त्रास करून घेण्यांत काय अर्थ आहे ? या धर्मांतरानें माझा पुनर्जन्म झाला आहे. आतां मागल्या जन्मींच्या आपल्या पत्नीचें पाऊल वांकडें पडलें म्हणून या जन्मीं हैराण होण्यांत हंशील नाहीं. ' आप मरे पीछे मर गई औरत ' असेंच मानलें पाहिजे.

**करीमखान**--तेव्हां म्हणतों तुम्ही बिनघोर परत जा. आठपंधरा दिवसांत तुमचा पति तुमच्या पायांशीं हजर आहे, असें समजा. जा तुम्ही आतां.

[ काशीबाई जाते.

**रहीमबक्ष**--आत्तां माझ्या उरावरची धोंड उतरली ! देखो करीम, कुछ भी करो, मुझे जलदी एकादी बिबी मिळवून दे !

**करीमखान**--अरे, तुझ्यासारखा बिब्बा असतांना बिब्यांना रे काय तोटा? दोनतीन दिवसांत बिबीसह मुलाखतीला येतों. अच्छा! सलाम. [ जातात.

## प्रवेश दुसरा

[ **स्थळ**:--मुधोळ. बाजी घोरपड्यांचा महाल. बाजी प्रवेश करतो. ]

**बाजी घोरपडे**--मालोजीला पकडून कैदेंत डांबून टाकला. शिवाजीचा एक साह्यकारी आमच्या ताब्यांत आला! शिवाजीच्या नाशासाठीं आजपर्यंत मीं व मालोजीनें अनेक मसलती केल्या, नानाप्रकारचीं कारस्थानें रचलीं; पण शेवटीं शिवाजीला सामील होऊन मालोजीनें मित्रद्रोह व राजद्रोह केल्यामुळें त्याला कैदखाना दाखविणें, मला माझी इभ्रत राखण्यासाठीं भाग पडलें! राजकारणांत बाप, भाऊ, इष्टमित्र असलीं नातीं-गोतीं जर आम्ही पाहूं लागलों तर राजकारण गोत्यांत येईल आणि सत्ताधाऱ्यांची किंमत कवडीमोल झाल्याशिवाय राहाणार नाहीं. शिवाजीचे जे जे अनुयायी सांपडतील, त्यांना त्यांना बंदिखान्यांत लोहशृंखलांनीं बद्ध करून टाकलें, म्हणजे शिवाजीची शक्ति आपोआप संपुष्टांत येईल. आणि आपली राष्ट्रघातकी चळवळ बंद करून, मुठींत नाक धरून, तो आम्हांला शरण येईल. मालोजी व आम्ही व्याही व्याही होणार होतों; पण आज एकमेकांचे वैरी बनलों आहोंत. एकमेकांच्या मुली आम्ही पत्करणार होतों ते आज आम्ही उभयतांनीं शत्रुत्व पत्करलें आहे! खरोखर राजनीति ही वारांगनेसारखी आहे. ती कोणावर केव्हां फिदा होईल व केव्हां कुणाला लाथाडून देईल त्याचा नेम नाहीं. भोसल्यांचा विजापूरदरबारांतील बडेजाव बंद पडून, आम्हां घोरपड्यांचाच बोलबाला सर्वत्र व्हावा, म्हणून त्या शहाजीला मीं दगाफटका केला व त्याची ब्याद दूर कर्नाटकांत पिटाळून लावली. पण त्याच्या पोरीनें--या शिवाजीनें--मुलुखभर अशी कांहीं धामधूम उठवून दिली आहे कीं, त्यामुळें तो शहाजी पुरवला पण हा शिवाजी नको असें म्हणण्याची आमच्यावर पाळी आली आहे! त्याच्या स्वातंत्र्याच्या चळवळीमुळें सारी रयत बिथरून गेली असून, त्यानें केवळ आदिलशहालाच नव्हे तर तमाम तालेवार तख्तनशीनांनाही त्राहीभगवान् करून सोडलें आहे! आतां

आमच्या सूर्याजीनें त्याच्या नाशाची प्रतिज्ञा केली आहे खरी; पण त्याच्या हातून ही जोखमदारी पार पडेल अशी कांहीं मला आशा दिसत नाहीं. कारण, कर्तव्याच्या प्रेमापेक्षां प्रेमाच्या कर्तव्याकडेच त्याचा अधिक कल दिसत आहे. कांहींही असो, प्रथम मला मालोजीचा निकाल केला पाहिजे. तो जर सरळपणानें शिवाजीचा छंद सोडून, पातशहाची पूजा-प्रतिष्ठा पूर्ववत् करण्याचें मान्य करील तर ठीक; नाहींतर त्या थेरड्याचा शिरच्छेद करून, त्याच्या राजद्रोहाच्या पापाचें प्रायश्चित्त त्याला दिल्याशिवाय हा निमकहलाल बाजी कधींही राहणार नाहीं. [ जातो.

---

## प्रवेश तिसरा

[ **स्थळ**:—रहीमबक्षाचें घर. रहीमबक्ष बाशिंग बांधून प्रवेश करतो. ]

**रहीमबक्ष**—पोरी पळविण्याची सध्यां सांथच आलेली दिसते. पोरी पळविण्याच्या या वहात्या गंगेत, मलाही जर माझी दाढी धुऊन घेतां आली असती, तर फार नामी झालें असतें ! करीमनें कबूल केल्याप्रमाणें आज मला बिबी आणून दिली तर ठीक आहे; नाहींतर फाजलखांची पोर पळविल्याशिवाय हा रहीमबक्ष रहाणार नाहीं. [ फाजल येतो. ] या तुम्ही ! तुमची पोर नाहीं ना अजून कोणी पळविली ? पोरींना पाय फुटले म्हणजे बापांचें कपाळ फुटतें ! आणि पळत्या पोरींचा पाठलाग करतांना पित्याला पळतां भुई थोडी होते ! बाकी तुम्हांला या बाबतींत धास्ती बाळगण्याचें कारण नाहीं म्हणा ! कारण तुमच्या दाढीपेक्षां तुम्ही आपल्या पोरीलाच जास्त जपतां; मग तिला कोण पळविणार ? पण काय हो, आमचा दोस्त करीम कुठें आहे ?

**फाजलखान**—मुझे क्या मालूम ? आज तेरी शादी है ना, इसवास्ते मैं आया हूं. क्या आज तेरी शादी नहीं है ?

**रहीमबक्ष**—अरे, शादी आहे तर काय झालें; पण मादी कुठें आहे ? लग्नासाठीं मी नवरदेव बाशिंग बांधून तयार आहें. तुझ्यासारखा वऱ्हाडी दाढी धरून सज्ज आहे ! बाजाबिजाची तर जरूरच नाहीं. कारण शादीनंतर घरांतच दुल्हादुल्हनचा बाजा वाजणार ! पण नवरी पाहिजे ना ? लग्नांत बाकीच्या गोष्टी नसल्या तरी चालतील; पण नवरानवरी मात्र

अवश्य पाहिजेत. पण माझी प्रिय कशी अजून येत नाहीं ? ( पडद्यांत–'प्रियाबिन नाहीं आवत चैन ' हें पद करीम गुणगुणतो. ) अहाहा, आतां मात्र माझी मनमोहन प्यारी आली. फाजल, आयी–आयी, मेरी प्यारी आयी !

[ बुरखा पाघरून करीमखान प्रवेश करतो. ]

**करीम**–सलाम करती हूं नबाबजादा ! जी हुजूरखां ! रहीमबक्षसाहेब सलाम !

**रहीमबक्ष**––पण तूं कोण ?

**करीम**––मी कोण तुम्हांला माहीत नाहीं ? माझें नांव दौलताबादेंतच नव्हे तर अलम् दख्खनला महशूर आहे. मैं फाजलखांकी खुपसुरतबला हूं!

**फाजलखान**––क्या मेरी खुपसुरतबला ! ये क्या गडबड घोटाला !

**रहीमबक्ष**––अस्सें-अस्सें ! आपण का खुपसुरतबला ?

**करीमखान**––होय. माझे बाबा अगदीं नादान आहेत. मला घरांत कोंडून ठेवतात आणि आपण गांवगन्ना गाढवासारखे रंगबाजीचे ढंग करीत बसतात ! पण मी त्यांना थोडीच भीक घालतें आहें. ते घराबाहेर पडले कीं मीही हळूच गांवभर गुंगारा मारून येतें ! आतांसुद्धां त्यांची नजर चुकवूनच मी इकडे आलें आहें. त्यांनीं मला अगदीं सतावून सोडलं आहे. या लढाईच्या धामधुमींत गोळी लागून ते थंडगार झाले तर किती छान होईल ! ते मेल्यावर तुम्हीं व्हाल ना माझे मानलेले बाप ?

**रहीमबक्ष**––मी तुझा मानलेला बाप तर नाहींच; पण मानलेला नवरा होण्यास, एका पायावर तयार आहें. (एका पायावर उभा राहतो. फाजल रागानें येऊन त्याला धक्का देतो. रहीम खालीं पडतो. )

**फाजलखान**–नामर्द ! मेरे बेटीका मर्द होनेको उतारू होता है ! फिर ऐसी बात करेगा तो तेरे हड्डीका चूरन तेरेकोहीं खिलाऊंगा ! छोकरी, तूं बारबार बाहर कायकू आती ? कोई तुझको भगाकर ले जायगा ना ! मैं तुझको पिंजडेमें रखता हूँ, लेकिन तू ऐसी नटखट है कि पिंजडा साथ लेकर उड जाती है, बस्स ! अभी ऐसा नहीं बनेगा; तेरी शादी झट् करनी चाहिए.

**करीमखान**––हं ! इसीवास्ते मैं इदर आयी हूं.

**रहीमबक्ष**––हृदयेश्वरी तूं उभी कां ? तुझे पाय दुखायला लागले असतील. हा बुड्ढा फाजल इथें नसता तर मी तुझे पाय चुरले असते. तुझा बुरखा काढून— ( बुरखा काढण्यास जातो. )

**करीमखान**--( मुरका मारतो ) मुझे तो शरम लगती है.

**रहीमबक्ष**--पण लाडके, तूं बेलाशक बेशरम हो, माझी मुळींच हरकत नाहीं. तेरा हुस्न देखना तो सही.

**करीमखान**--' ये हुस्न है दो घडीका. ' ये बूढेको हकाल दो पहिले.

**रहीमबक्ष**--असें का ? मग फाजलभाई तुम्ही आतां काढता पाय घ्या. आमची शादी वगैरे होऊन गेल्यावर, पानसुपारीला तुम्हांला बोलावूं. तुम्ही जा आतां.

**फाजलखान**--हम नहीं जाएंगे ! तेरी शादी और मादी देखेंगे, और पीछेसे मै जाऊंगा. ( स्वगत ) इधर कुछ दालमें काल मालूम पडता हैं. इसकी औरत कैसी है देखना तो चाहिये. दिलखुष होगी तो उसको भगानेकी कोशीस करना पडेगा. मेरे जैसे बुड्ढेको औरतके बारेमें बहोत तकलीफ होती है.

**रहीमबक्ष**--फाजल, तूं चालता होत नाहींस ?

**करीमखान**--ये बुड्ढेकी सफेत दाढी देखकर मेरा जी घबरा रहा है.

**रहीमबक्ष**--फाजल, तुझ्या दाढीमुळें माझी प्रिया घाबरून गेली आहे. तूं अगोदर तोंड काळें कर.

**फाजलखान**--हम कभीभी नहीं जाएंगे ! ( बसतो. ) पहिले शादी और फिर बंदगी.

**रहीमबक्ष**--लाडके ! हा बेवकूफ बोकड ऐकत नाहीं आणि माझा जीव तर तुझें स्वर्गीय सौंदर्य पहाण्यासाठीं व्याकुळ होत आहे. तर आतां तुझा मुखचंद्र या बुरख्याच्या ढगाबाहेर पडूं दे.

**फाजलखान**--हां-हां ! घुंगट निकाल कर तेरा हुस्न ये तेरे आषकको दिखला दो.

( तो बुरखा बाजूस करतो. करीम नखशिखान्त काळ्या रंगांत यावनी स्त्रीवेषांत दिसतो. )

**रहीमबक्ष**--अरेरे ! या मुखचंद्राला तर खग्रास ग्रहण लागलें आहे !

**करीम**--बाकी माझ्या खूपसूरतीनें बुढा मात्र गारीगार झाला आहे !

**रहीमबक्ष**—तुझा काळाकुट्ट चेहरा पाहून माझें तोंड मात्र गोरेंमोरें झालें आहे. या कोळशाच्या खाणीवर तें बुरख्याचें बारदानच बरें आहे. ही परस्तानांतली परी आहे कीं कबरस्तानांतली बकरी आहे ?

**फाजलखान**--इसका रंग काला है लेकिन् मेरे जैसे बुड्ढेको यह माल ठीक है.

**रहीमबक्ष**--प्यारी, तुझ्या सौंदर्याचें वर्णन करायला माझ्या डोक्यांत शब्दच सुचत नाहींत ! तुला मी आवडतों कीं पांढऱ्या दाढीचा हा फाजल आवडतो ?

**करीमखान**--फजुल बातें करकें मुझे सताना नही. मैं तो नाजुक नार !

**फाजलखान**--लेकिन् मुझे करती है ठार !

**करीमखान**--मै अनार की कली !

**रहीमबक्ष**--जैसी मुंगफली.

**करीमखान**--ये जानवर कौन है ?

**फाजलखान**--प्यारी, ऐसा नहीं कहना; हम क्या जानवर है ? जानवरको चार पाँव रहते है. हम तो मोहबतखानसाहबके बडे ओहोदेदार दानीष्मंद है ! मेरे साथ तूं शादी करेंगी तो तुझे मालुम पडेगा, कि मै कैसा आषक हूं; और इष्ककी आतषबाजी कैसी उडती है. सब रंगेली बातें मैं खुल्लमखुल्ला कहूंगा तेरेको.

**करीमखान**--अच्छा. मेरे प्यारेके साथ, मुझे रंगीली रसीली बातें करनेकी इच्छा है. तो पहिले मुझे बतावो कि मेरा आषक कौन है ? ( फाजलकडे बोट करून ) यह मेरा आषक है क्या ? नही नही, ये मेरा बाप है.

**फाजलखान**--तूं मेरी बेटी नही है. कहां खुबसूरतबला और कहां ये करबला !

**करीमखान**--फिर क्या, ( रहीमकडे पाहून ) यह मेरा आषक है !

**रहीमबक्ष**--जी हां, प्यारी ! मै आषक आकर द्वार खडा है. तुझ्या सौंदर्याचें वर्णन करतांना जीभ अडखळूं लागते व छाती धडधडूं लागते; जगांतील सर्व सुंदर वस्तूंच्या सामग्रीनें विधात्यानें त्रैलोक्यसुंदर तिलोत्तमा घडविली, त्याप्रमाणें विश्वांतील सर्व घाण एके ठिकाणीं करून, ब्रह्मदेवानें तुझ्या शरीराची घडण केली असावी. तिलोत्तमेला निर्माण करतांच ब्रह्मदेवाचीं एकाचीं चार तोंडें झालीं, तर तुझी घडण अर्धीमुर्धी होत आहे तोंच ब्रह्मदेवानें राम म्हटलें असावें. तुझ्या शरिराचा प्रत्येक अवयव

विजापुरच्या इमारतीशीं स्पर्धा करीत आहे. तुझें नाक म्हणजे गालांच्या उपल्या बुरजावर ठेवलेली लांडाकसाब तोफच आहे. तुझे डोळे म्हणजे मुलुखमैदान तोफेचे गोळे, त्या गोळ्यांनीं गर्भिणींचे गर्भपात होतात, तर तुझ्या डोळ्यांनीं पुरुषासारखे पुरुष गर्भगळित होतात. तोफेच्या गोळ्यांनीं शेंकडों शिपाई घायाळ होत असले, तर तुझ्या डोळ्यांच्या हालचालींनीं लाखों लोकांचे मुडदे पडतात.

**फाजलखान**--प्यारी, मेरी सुफेत दाढी देख, और मेरे साथ शादी कर.

**करीमखान**--मी कांहीं पांढऱ्या पायांची नाहीं कीं मला पांढऱ्या दाढीचा बोकड आवडेल! मी आपली काळतोंडी आहें तेव्हां मला काळा दाढीवाला नवराच पसंत पडेल. ( रहीमच्या गळ्यांत हात टाकते. )

**रहीमबक्ष**--( स्वगत ) असल्या काळ्या नागिणीशीं निका लावायचा, म्हणजे स्वतःचाच निकाल करून घ्यायचा! अल्लाच्या अजबखान्यांतली ही अवखळ अवलाद आपल्याला औरत नको. ती फाजलच्या माथीं मारून आपण खुपसुरतबला उपटावी हें बरें. (उघड) हें पहा फाजल, आपल्या काळयागोऱ्यांचा वाद मिटवून आपण सन्मानाचा समेट करूं या. तुम्ही ती बदसुरतबला उचला आणि तुमची खुबसुरतबला आम्हांला द्या.

**फाजलखान**—हां-हां बहोत अच्छा; बदसुरत क्यू न हो, लेकिन औरत तो है? तो ठीक मामला हो गया, मुझे ये माषुक पसंत है.

[ बुरखा पांघरून काशीबाई प्रवेश करते. ]

**काशीबाई**—रहीमबक्षसाहेबका मकान यही है क्या?

**रहीमबक्ष**—अरे, आज माझ्या घरावर बायकांची संक्रांत आहे कीं काय? आतां इथें बुरखी बायकांचा बाजार भरणार असें दिसतें!

**काशीबाई**—मुझे करीमने भेजी है. रहीमकेसाथ मेरी शादी होनेवाली है.

**रहीमबक्ष**—धन्य आहे मेरी किस्मत! आतां माझा जनानखाना भरगच्च भरणार खास. देवाजवळ एक डोळा मागितला असतां त्यानें दोन द्यावेत, त्याप्रमाणें मीं एका बिबीची इच्छा करतांच खुदानें दोन औरती माझ्याकडे पाठवल्या. खुदा, आतां मात्र खैर कर. नाहींतर ह्या बायकांच्या बरसातींत मीं बुडून ठार होऊन जाईन. अहो बुरखानिवासी बाई! रहीमची शादी होऊन गेली; आतां तुम्ही तुमची दुसरीकडे सोय पहा

**काशीबाई**— क्या, रहीमकी शादी हो चुकी ? आ मारा बाप ! मेरा करम फुट गया ! मेरे दिलका दिवाला निकल गया ! मै अभी मर जाती हूं. रहीमके नामपर इधरही मै जान निसार करती हूं. ( रडूं लागते. )

**रहीमबक्ष**—अहाहा ! हिचें किती अलोट प्रेम आहे या रहीमवर, पण हिचें सौंदर्य एकदां पहायला मिळतें तर फार बरें झालें असतें. सांगूं का हिला बुरखा काढायला ? पण नको. मघांशीं बुरख्यांतून ती काळी नागीण बाहेर पडली, तशी एखादी अस्वलीण बाहेर पडून मला बिलगायची ! मला वाटतें, आतां हिच्याशींच शादी करावी. बस्स ! प्यारी, तुझ्याशींच आपण निका लावणार. या रहीमवर निस्सीम प्रेम करणारी तुझ्यासारखी प्रेमप्यारी सोडून, नुसत्या नखरेल व निर्लज्ज नारीशीं निका लावण्यांत काय हंशील आहे ? ठरला निश्चय ! आपण तुझ्याशींच लग्न लावणार.

**काशीबाई**—पण मेरा एक पण है.

**रहीमबक्ष**—तो कोणता ?

**काशीबाई**—आपण दोघांनींही हिंदु होऊन लग्न करायचं.

**रहीमबक्ष**—एवढेंच ना ? कबूल. नाहीं तरी ह्या धर्मांतराची मला शिसारी आली आहे. तुझ्या सर्व अटी आपण मान्य करतों. अल्लाची कसम खाऊं कीं रामाची शपथ घेऊन तुझी खात्री करून देऊं ? का तुझ्या हातावर हात मारून वचन देऊं ?

**काशीबाई**—हां–हां, दूर व्हा. एव्हांशीं मला स्पर्श करूं नका.

**रहीमबक्ष**—ठीक आहे. उद्यां गर्गाचार्यांच्या मुहूर्तावर आपण हिंदु होऊन गोरज मुहूर्तावर आपलें शुभमंगल सावधान करून टाकूं.

**करीमखान**—हां, असेंच करा; आणि मीही हिंदु होऊन तुमच्यावर मंगलाक्षता टाकायला येतों. ( स्त्रीवेष व बुरखा काढून फेंकून देतो. )

**फाजलखान**—या अल्ला ? ये क्या बला ! ये तो औरत नही है. यह बदमाश करीम है. तोबा, तोबा ! !

**करीमखान**—थांब, तुला तोबेच लगावले पाहिजेत. मेरेसरीखे मर्द के साथ शादी करनेकी शरम नही लगती तेरे को ? ( तोबे लगावतो. )

**फाजलखान**—करीम, मुझे माफ करो. तोबा तोबा ! ( पळून जातो. )

**रहीमबक्ष**—चला, आतां मंगलकार्याला आपण लागूं या. (जातात.)

## प्रवेश ४ था

[ **स्थळ**--प्रणयकुंज नांवाचें विलासमंदिर. **सूर्याजी व शेवंती.** ]

**शेवंती**—त्या नीच सूर्याजीनं मला जबरदस्तीनें पळवून आणून या प्रणयकुंजांत ठेवली आहे. आतां माझी सुटका कशी होणार ! दयाघना, आतां तूंच माझा वाली !

**पद**

**या समया ना उरला, कोणी, प्रभुराया,**
**तुजविण वाली, अधम खलनाशा ॥ धृ० ॥**
**एकलि अबला, जणु मृगबाला ।**
**गवसली आज व्याघ्रमुखीं या ॥ १ ॥**

**सूर्याजी**—शेवंती, मी एकसारखीं तुझीं आर्जवें करतों आहें; पण तूं कांहीं ह्या तुझ्या भक्तावर अजून प्रसन्न होत नाहींस. माझ्या या प्रणयदेवतेची आराधना भक्तिभावानें मी करीत असतां, तुझ्या मुखावरचा तिरस्काराचा कृष्णमेघ नाहींसा होऊन, प्रणयाची खुलावट अजून त्या ठिकाणीं कां खेळत नाहीं ? सूर्योदयाबरोबर कमलें प्रफुल्लित होतात, तसें या सूर्याजीच्या दर्शनानें तुझें मुखकमल प्रफुल्लित कां होत नाहीं ? कोणत्या उपायानें तुला प्रसन्न करून घ्यावी तेंच मला समजत नाहीं !

**शेवंती**—सूर्याजी, माझ्यासारख्या एकाकी व निःसहाय्य अबलेला तुम्ही कां बरं छळत आहां ? तुमच्यावर माझं प्रेम नाहीं, हें मीं तुम्हांला अनेकदां कळविलं आहे. मला माझ्या बाबांच्या घरीं मुकाट्यानं जाऊं द्या. माझ्यासंबंधाची तुमची इच्छा कालत्रयींहि पूर्ण होणार नाहीं ! तुम्ही दुसरी मनाजोगती मुलगी पाहून सुखानं संसार कां करीत नाहीं ?

**सूर्याजी**—त्यामुळें मला संसाराचें खरें सुख लाभणार नाहीं म्हणून. शेवंती, आकाशांत लाखों चटकचांदण्या आवतींभोंवतीं बागडत असतां, एका रोहिणीच्या अक्षय सान्निध्याची चंद्राला नेहमीं चिंता लागलेली असते आणि त्यासाठीं स्वतःला कलंकित व क्षयी बनवून घ्यायला तो मागेंपुढें पहात नाहीं. त्याप्रमाणें तुझ्या प्राप्तीसाठीं हा सूर्याजीसुद्धां स्वतःला

लांछनमय करून घेईल; पण तुझ्यासारखी तेजस्विनी, ह्या सूर्याजीची सहधर्मचरिणी झालीच पाहिजे.

**शेवंती**---पर्वतांना पंख फुटून एक वेळ ते आकाशांत उडूं लागतील; पण तुम्हांला कुंकवाचा धनी करून घ्यायला ही शेवंती कधींही तयार होणार नाहीं !

**सूर्याजी**—पण तुझी इच्छा असो वा नसो, तुझ्याशींच लग्न करून संसारी आयुष्य घालविण्याचा मीं कृतनिश्चय केला आहे.

**शेवंती**---या शेवंतीच्या कुडींत प्राण आहे तोंपर्यंत तरी ही गोष्ट शक्य नाहीं; तिच्या कलेवराशीं कदाचित् तुमचें लग्न लागूं शकेल. तुमच्या नांवानं गळ्यांत मंगळसूत्र अडकवितांच, तात्काळ तें अमंगळ-सूत्र बनून जाईल व त्याचा कालपाश तयार होऊन कंठीं आलेल्या माझ्या प्राणांना तो हरण करून नेईल !

**सूर्याजी**—शेवंती, कसल्या अभद्र गोष्टी तूं बोलत आहेस. तुझ्या मुखांतून प्रणयाचीं मुक्ताफळें बाहेर पडायचीं; तुझ्या रसनेंतून सुरस सुधा-रसाचा स्राव व्हायचा; तुझ्या विदग्ध वाणींतून प्रेमामृताचे बोल बाहेर पडायचे; असें असतांना आज ही अमंगळ आणि अनुचित भाषा तुझ्या मुखांतून बाहेर पडावी याचें मला मोठें नवल वाटतें ! शेवंती विचार कर; उगीच हट्ट करून तुझ्या व माझ्या दुःखाला कारण होऊं नकोस. तूं माझी अर्धांगी झालीस म्हणजे तुला कांहीं कमी पडणार नाहीं. तुझ्या सुखासाठीं हा सूर्याजी रात्रंदिवस झटत राहील; आणि माझ्या सहवासापासून तुला अपरिमित सुख व आनंद मिळून, तूं धन्य होशील व मलाही धन्य करशील!

**शेवंती**---माधवी लता विषवृक्षावर चढविली तर तिला कधीं तरी सुख लाभेल का ? विषवृक्षाच्या विखारी आलिंगनानं, बिचारीची कोमल काया करपून मात्र जाईल खास !

**सूर्याजी**---पण शेवंती, तूं ह्या सूर्याजीचा इतका तिट्कारा कां करतेस तेंच मला समजत नाहीं. केवळ सुईच्या अग्रांनीं आपल्याला टोंचून घेतल्यामुळें, कंचुकीला स्त्रियांच्या कुचमंडळावर वास्तव्य करावयास मिळतें; मग ज्या रण-धुरंधरानें प्रखरतर शरांनीं व शस्त्राघातांनीं, आपलें शरीर विकल करून घेतलें आहे, त्या मला तुझ्यासारख्या अप्सरेच्या आपाद आलिंगनाचा आनंद

कां मिळूं नये ? कोणाही तरुणीच्या मनाला दिपवून टाकणारा ह्या सूर्याजीचा पराक्रम तुला माहीत नाहीं का ? रणांगणावर अजिंक्य असलेला हा नरवीर सूर्याजी, प्रणयाच्या बाबतींत मात्र पराभूत झाला आहे खरा. शत्रूपुढें गुडघे टेकणें शौर्यशाली पुरुषाला शरमिंदेपणाचें वाटत असलें, तरी आपल्या प्रणयिनीपुढें एकदां सोडून शंभरदां गुडघे टेकण्याचा प्रसंग आला, तरी त्यांत त्याला भूषणच वाटतें ! शेवंती, तुझ्यापुढें गुडघे टेकून तुझीं आर्जवें करायला, हा तुझा दास एका पायावर तयार आहे. ( गुडघे टेकतो. )

**शेवंती**—माझ्यापुढं गुडघे टेकण्याऐवजीं शिवाजीमहाराजांना शरण जाऊन-

**सूर्याजी**—शिवाजीला शरण जाण्याची तूं गोष्टच बोलूं नकोस. तुझ्यापुढें मीं गुडघे टेकले असले, तरी शिवाजीला मी माझ्यापुढें गुडघे टेकायला लावल्याशिवाय राहणार नाहीं, समजलीस ! शेवंती, विचार कर. गेली घडी परत येणार नाहीं बरं ! तुझा ताठा व गर्विष्ठपणा एका क्षणांत नाहींसा करून, तुझ्या अब्रूचे धिंडवडे काढायला ह्या सूर्याजीला तूं आपल्या कृतीनें भाग पाडीत आहेस ! अग्नीच्या आंचेनें लोखंडालाही मऊ मेण बनवितां येतें हें तूं विसरूं नकोस. अजून शुद्धीवर ये आणि माझ्या म्हणण्याला कबूल हो.

**शेवंती**—कामांधा, तूंच प्रथम शुद्धीवर ये आणि आपल्या कृष्णकर्माकडे पहा. दुसऱ्यांच्या मुली जबरदस्तीनें पळवून नेऊन, त्यांच्या अब्रूवर घाला घालण्याचा तुझा राक्षसी हेतु, जगांत परमेश्वरी सत्ता सुरू आहे तोंपर्यंत तरी कधींच तडीस जाणार नाहीं. परकी सत्तेचा नेहमीं उदो उदो करून, आपल्याच मायभूमीच्या अंगावर अंगार ठेवणाऱ्या तुझ्यासारख्या कुलांगारांशीं, जन्माचाच काय, पण क्षणाचाही संबंध ठेवायला महाराष्ट्रां-तील एकही कुलवधू तयार होणार नाहीं. त्या दिवशीं तुझ्या त्या नीच पित्यानं महाराजांची तसबीर पायाखालीं तुडविली; पण त्याच वेळीं शेंकडों महाराष्ट्रीयांचीं अंतःकरणं बाजी घोरपड्यानं आपल्या पायांखालीं निर्दयतेनें तुडविलीं आहेत ! पण त्याच्या ह्या पापाचं प्रायश्चित्त सगळ्या घोरपडे घराण्याला भोगावं लागणार आहे, हें पक्कें लक्षांत ठेव.

**सूर्याजी**—अंः ! आम्हां आदिलशाहीच्या खंदेवीरांना असल्या गोष्टींनीं भय उत्पन्न होईल असें का तुला वाटतें ? अग, बाबांनीं शिवाजीची नुसती

तसबीरच पायांखालीं तुडविली; पण हा सूर्याजी तर प्रत्यक्ष शिवाजीला आपल्या प्रबल पदाखालीं ठेंचणार आहे.

**शेवंती**—नीचा, तुझ्या तोंडचा एक शब्दही ऐकण्याची माझी इच्छा नाहीं.

**सूर्याजी**--मग माझ्या इच्छेला तूं मान देणार कीं नाहीं ? तूं होय म्हण, किंवा नुसता मानेनें होकार दे. नजरेच्या नाजूक इशाऱ्यानें संमति दर्शविलीस किंवा मुक्यानें आपलें मनोगत कळविलेंस तरी हरकत नाहीं. तुझे मागचे सर्व अपराध विसरून जाऊन तुझ्याशीं गांधर्वविवाह करून--

**शेवंती**--गांधर्वविवाह ? जबरीचा विवाह गांधर्वविवाह होत नाहीं, तर तो गर्दभविवाह होत असतो ! स्त्री-पुरुषांचं एकमेकांवर प्रेम नसतां जो विवाह केला जातो, तो मुळीं विवाह नव्हेच ! ती केवळ विवाहाची थट्टा होय.

**सूर्याजी**--पुरे कर. विवाहावरचें व्याख्यान तुझ्या तोंडून ऐकण्यासाठीं कांहीं मी तुला या प्रणयकुंजांत आणलेली नाहीं. तूं बऱ्या बोलानें मला वश झाली नाहींस, तर जबरदस्तीनें मी तुला माझ्या इच्छेला बळी देईन. तूं त्या शिवाजीवर फिदा आहेस आणि म्हणूनच तूं माझी वारंवार अवहेलना करतेस हें मला माहीत आहे; पण आज तुझ्या अब्रूची धूळधाण करून, शिवाजीच्या-तुझ्या त्या जाराच्या-समाचाराला मी जाणार आहें. एक यःकश्चित् तरुणी जर मला वश करून घेतां आली नाहीं, तर मग माझें सामर्थ्य तें काय आणि माझा पुरुषार्थ तरी कोणता ! बस्स ! तें कांहीं नाहीं. तुझा अस्सा हात पकडून ( हात धरावयास जातो तोंच **मैना** येऊन दोघांच्या मध्यें उभी राहते. )

**मैनावती**—हां-हां, दादा, हा काय अविचार चालविला आहेस ?

**सूर्याजी**--मैने, तूं कशाला या वेळीं इथें आलीस ?

**मैनावती**--कशाला म्हणजे ? माझ्या मैत्रिणीच्या संरक्षणाला; आणि माझ्या भावाचा अधःपात टाळण्यासाठीं !

**सूर्याजी**--मैने, दूर हो. माझा अधःपात टाळण्याचा लांडा कारभार करायला तुला सांगितलें आहे कुणीं ? आणि माझ्या हातीं सांपडलेल्या, ह्या सौंदर्यललनेला सोडविण्याचें सामर्थ्य, तुझ्या कोमल करांत खात्रीनें नाहीं.

**मैनावती**--दादा, कां उगीच त्या बिचारीचा छळ चालविला आहेस ?

तिचं जर तुझ्यावर प्रेम नाहीं तर तूं तरी इतका हट्ट कां करतोस ? तुझ्या प्राप्तीसाठीं दुसऱ्या शेंकडों तरुणी झुरत असतील—

**सूर्याजी**—माझ्या प्राप्तीसाठीं शेंकडों तरुणी झुरत असतील; पण मी ह्या तेजास्विनीसाठीं झुरणीस लागलों आहें ना ! तेव्हां तिला हस्तगत करून घेणें माझें कर्तव्यच आहे. मीं हिला जर हातची सोडली तर जगांत वर तोंड करून मला वावरतां तरी येईल का ! आणि आमच्या घोरपडे घराण्याच्या अब्रूला त्यामुळें केवढा धक्का बसेल, त्याचा विचार मला करायला नको का ?

**मैनावती**—परस्त्रीची बेअब्रू करून तूं घराण्याची अब्रू राखणार, असंच ना ? दादा, अरे तुझ्या पापाचरणानं केवळ तूं स्वतःचाच नव्हे तर साऱ्या घोरपडे घराण्याचा अधःपात करतो आहेस. व्यक्तीचं पाप कुळाच्या नाशाला कारण होत असतं. मनुष्याचं काळं झालेलं तोंड धुऊन स्वच्छ करतां येईल; पण कुळाला लागलेला काळिमा कोणत्याहि उपायानं नाहींसा होणार नाहीं. दादा, सतीच्या छळानं पूर्वी केवढे मोठमोठे अनर्थ झाले आहेत ते तुला माहीत नाहींत का ? सीतादेवीच्या छळामुळें चौदा चौकड्यांचा रावण धुळीला मिळाला ! द्रौपदीच्या छळाच्या पापामुळें एकट्या दुर्योधनाचाच नव्हे तर उभ्या कौरवकुळाचा विध्वंस झाला—

**सूर्याजी**—मैने, हें पुराणांचें पुराण पुरे कर पाहूं ! आणि एकदम इथून चालती हो.

**शेवंती**—मैने, ऐश्वर्याच्या व अधिकाराच्या मदानं धुंद झालेल्या आणि पापाची पाऊलवाट तुडविणाऱ्या या बेहोष वाटसरूला, तुझा सन्मार्गाचा उपदेश कदापि रुचणार नाहीं.

**मैनावती**—दादा, तुझ्या ह्या नीच कृतीमुळें तुला माझा भाऊ म्हणवून घ्यायची मला लाज वाटूं लागली आहे.

**सूर्याजी**—आणि मैने, माझ्या प्रेमकार्याच्या आड येण्याच्या तुझ्या ह्या आर्ष कृतीमुळें, तुला माझी बहीण म्हणून साद घालण्याची मलादेखील शरम वाटते ! शेवंती जर माझा मनोभंग करून प्रेमभंग करण्यास तयार झाली आहे, तर मला ही शेवंतीच्या शीलाचा भंग करून तिचा तोरा नाहींसा केलाच पाहिजे. माझ्या शौर्याला—

**मैनावती**—शौर्य ? हें तुझं शौर्य ? दुसऱ्यांच्या मुलीच्या शीलावर धाड घालण्याचं तुझं हें कृत्य शौर्य ? धिक्कार असो अशा शौर्याला !

**पद**

**धिःकार तव पौरुषा । कुटिल,**
**खल, दुर्मति, पापराशी अशा ॥ धृ० ॥**
**तव निंद्य कर्मा, नच अन्य उपमा ।**
**हा मार्ग अधमा, थोर कुल लांछना ॥ १ ॥**

दादा, नीट शुद्धीवर ये. घोरपडे घराण्याचा पांच पिढ्यांचा लौकिक, असल्याच शौर्यांनीं आपल्या पूर्वजांनीं मिळविला आहे होय ? दादा, हें तुझं पाप देवाला पाहवणार नाहीं; तसंच बाबांच्या कानांवर जर तुझं हें कृत्य गेलं, तर ते तुझी छीः थूः केल्याशिवाय राहणार नाहींत.

**सूर्याजी**--आमच्या हाडवैऱ्याला--त्या शिवाजीला--पकडण्यासाठीं निवडक स्वार घेऊन बाबा मालोजीरावांच्या वाड्याकडे गेले आहेत. तेव्हां ते तिकडून परत येण्यापूर्वींच मी शेवंतीला भ्रष्ट करून, माझी प्रतिज्ञा पूर्ण करणार. ह्या कृत्यामुळें जरी बाबांचा माझ्यावर कोप झाला, तरी मी त्याची मुळींच पर्वा करीत नाहीं ! पण तुझ्याशीं बोलत बसून मी ही सोन्याची घडी उगीच दवडीत आहें. ह्या माझ्या प्राणवल्लभेच्या— ( जवळ जातो. )

**शेवंती**--नीचा, मागें सर !

**मैनावती**—दादा, प्रत्यक्ष आपल्या बहिणीसमोर एका स्त्रीची विटंबना करतोस ?

**सूर्याजी**--मग तूं इथून चालती हो कशी ? तुला इथं यायला सांगितलें होतं कुणीं ? चल, चालती हो इथून !

**मैनावती**—प्राण गेला तरी मी हलायची नाहीं इथून—

**सूर्याजी**—अस्सं ? ठीक आहे तर. तुझी अशी मानगुटी धरून, तुला दूर लोटून, मी शेवंतीचं पाणिग्रहण करतों. ( मैनेच्या मानगुटीला धरून तिला दूर लोटतो. मैना मूर्च्छित पडते. )

**शेवंती**--पाप्या, अधमा, खबरदार एक पाऊल पुढं टाकशील तर ! पापाच्या मार्गातील पहिलं पाऊलच शेवटचं ठरत असतं, ध्यानांत ठेव.

**सूर्याजी**--शेवंती, मैनेचा निकाल लागला. या प्रणयकुंजांत आतां तुझ्या संरक्षणाला कोणता देव धावणार आहे?

**शेवंती**--कोणता देव? ज्यानं द्रौपदीची लाज राखली तो भगवान् श्रीकृष्ण!

**सूर्याजी**--तो सोळा हजार एकशें आठ नारींची लाज कोळून पिणारा निर्लज्ज नारायण! गोकुळांतलि गुल्ज़ार गोपींच्या अब्रूची लूट करणारा, तो कृष्णकर्मा कृष्ण तुझी अब्रू राखणार? तर मग हांक मार तुझ्या त्या कैवारी कृष्णाला. गोपींच्याबरोबर रासक्रीडा करण्यांत दंग असलेला तो कामकुंजर, तुझ्या संरक्षणाला कसा काय धांवून येतो तें मलाही पहायचंच आहे.

**शेवंती**--नीचा, श्रीकृष्णाला कामकुंजर म्हणतांना तुझी जीभ कशी झडून पडत नाहीं? ज्यानं शिशुपाल, वक्रदंत, कंस वगैरे मदोन्मत्त हत्तींना धुळीस मिळविलं तो कामकुंजर नसून, तुझ्यासारख्या कामलंपटांचा कर्दनकाळ श्रीहरि आहे, समजलास? पण तुझ्यासारख्या कामातुर श्वानाला श्रीकृष्णाची योग्यता काय कळणार आहे!

**सूर्याजी**--बरोबरच आहे! आम्हांला त्याची योग्यता कशी कळणार? बायकांनाच कृष्णाची योग्यता कळायची. कारण त्यांना त्याच्याशीं रासक्रीडा करून पापाची रास रचायची असते! कालयवनाच्या भीतीनें पळून जाणारा तो पळपुटा कृष्ण; आणि गोपींचीं वस्त्रें हिरावून घेऊन, त्यांना आपलीं अंगवस्त्रें बनविणारा, व्यभिचारी वासुदेव तुझ्या हांकेला धांवणार होय?

**शेवंती**--पाप्या, तुझ्या प्रत्येक शब्दागणिक माझ्या अंगावर अगणित शहारे उभे राहतात! प्रत्येक वस्तुमात्रांत भरून राहिलेला परमेश्वर, माझ्या रक्षणासाठीं धांवल्यावांचून राहणार नाहीं. (खंजीर दाखविते.) हा पाहिलास माझा परमेश्वर! स्त्रियांच्या अब्रूचें रक्षण करणारा हा पाहिलास कृष्णमुरारी! तुझ्या छातींत जरी मला हा खुपसतां आला नाहीं, तरी माझ्या उरांत मात्र मी तो सहज खुपसूं शकेन, हें खरं ना? चांडाळा, तुझ्या पापी हाताचा स्पर्श ह्या देहाला होण्याचा अवकाश कीं, ह्या परमेश्वराची माझ्या हृदयांत प्राणप्रतिष्ठा झालीच म्हणून समज!

**सूर्याजी**—( स्वगत ) शेवंतीचा हा परमेश्वर मात्र खरोखरच कामकुंजर नसून बायकांच्या अब्रूचें रक्षण करणारा तारकेश्वर आहे खास ! आतां काय करावें बरें ? मीं जर हिला स्पर्श केला तर ही आपल्या उरांत खंजीर खुपसून घेतल्याशिवाय राहणार नाहीं ! आणि तसें झालें तर ह्या सौंदर्याचा बहर मला लुटतां येणार नाहीं. तर आतां या ठिकाणीं कांहीं तरी युक्ति लढविली पाहिजे. ( उघड ) छे–छे–छे शेवंती, तूं आपल्या हातांतून तो टाकून दे पाहूं. तें तीक्ष्ण शस्त्र, तुझ्या कुसुमकोमल करांत शोभत नाही. मी तुझ्या वाटेला यापुढें मुळींच जाणार नाहीं. मला माझ्या पापाबद्दल आतां पश्चात्ताप होत आहे. तूं ह्या दासाला क्षमा कर. ( समोर पाहून ) ओहोहो ! ते पहा, प्रत्यक्ष शिवाजीमहाराजच ( शेवंती समोर पाहूं लागते, इतक्यांत तिच्या हातांतील खंजीर सूर्याजी काढून घेतो व दूर फेंकून देतो. ) शेवंती, तुझें रक्षण करणारा तुझा परमेश्वर तो पहा धूळ खात पडला आहे. माझ्या हातांतून तुला सोडविणारा तुझा साहाय्यकर्ताच निःसहाय्य होऊन निश्चेष्ट पडला आहे. तुझा परमेश्वर मेला. मैना मूर्च्छित पडल्यामुळें तिचाही अडथळा दूर झाला. आतां मी माझे मनोरथ पूर्ण करून घेणार ! ( तिचे दोन्ही हात धरतो. ) आतां तुझा वाली कोण ?

**शेवंती**—सर्वांचा वाली—

**शिवाजी**—हा पहा शिवाजी हजर आहे.

[ खिडकींतून उडी टाकून **शिवाजी** व कांहीं **शिलेदार** सशस्त्र प्रवेश करतात. ]

**शेवंती**—अहाहा ! परमेश्वरानं माझ्या हांकेला धांवून आपलं ब्रीद खरं केलं !

**सूर्याजी**—( स्वगत ) कोण, आमचा हाडवैरी शिवाजी ! पण मी स्वप्नांत तर नाहीं ना ? शिवाजीला पकडण्यासाठीं बाबा गेले आहेत, मग त्यांना झुकांडी देऊन हा येथें आला कीं काय ! ह्याच्या ठिकाणीं कांहीं तरी अद्भुत शक्ति आहे खास !

**शेवंती**—महाराज, आपण ऐन वेळीं येऊन, ह्या राक्षसापासून माझं रक्षण केलंत ह्याबद्दल ही दासी आपली जन्मजन्मांतरीं ऋणी राहील. आपल्या चरणांवर ही शेवंती आपलं जीवनसर्वस्व आज अर्पण करीत आहे. तिला आपल्या चरणांचा आश्रय देऊन कृतार्थ करावी. ( गुडघे टेकते. )

**शिवाजी**—ऊठ शेवंती. सूर्याजी, असा गोंधळून काय गेलास? माझ्या नाशाची तूं प्रतिज्ञा केली आहेस ना? मग आतां उशीर कां? काढ तुझी ती देशद्रोही व राष्ट्रघातकी तलवार!

**सूर्याजी**—( स्वगत ) हें प्रणयकुंज आहे. येथें प्रेमयुद्ध होत असतें; आणि तेंहि सौंदर्यसंपन्न स्त्रियांशीं! ह्या ठिकाणीं तुझ्याशीं लढून तुझ्या रक्तानें ही विलासभूमि भ्रष्ट करावी अशी माझी इच्छा नाहीं.

**शेवंती**—सूर्याजी, माझा परमेश्वर धूळ खात पडलेला नसून, तुला धुळीचे दिवे चारायला इथं तुझ्यासमोर उभा आहे. आतां शरमेनें तोंड कां लपवतोस? माझ्या परमेश्वराच्या प्रभेनं निस्तेज होऊन तुझा पापी चेहरा काळाठिक्कर पडला आहे. माझ्या हाताचा स्पर्श तर दूरच राहिला. पण माझ्या परमेश्वराचे पाय धरून कृतापराधांची क्षमा माग. ह्या पवित्र चरणांच्या स्पर्शानें तुझीं आजपर्यंचीं सर्व पापं भस्म होऊन जातील. ठेव, ठेव ह्या चरणांवर तुझं कलंकित मस्तक!

**सूर्याजी**—( स्वगत ) प्रसंग मोठा बांका आला खरा! शत्रूच्या गराड्यांत मी सांपडलों आहें. ह्या वेळीं शेवंतीच्या सूचनेप्रमाणें वागल्यावांचून सत ना गत! गडबड केली तर जिवाला मुकण्याची पाळी यावयाची; आणि एकदां जीव गेल्यावर शिवाजीच्या नाशाची माझी प्रतिज्ञा पूर्ण कशी होणार? तेव्हां आतां क्षमेचें नाटक करूनच सुटका करून घेतली पाहिजे. ( उघड ) शिवाजी, मी तुला शरण आलों आहें. ( गुडघे टेकतो. ) माझे अपराध इतके भयंकर आहेत कीं, तुझ्या तलवारीनें माझ्या देहाचे शेकडों तुकडे केलेस, तरी माझ्या पापाचें पुरेपूर शासन मला मिळालें असें होणार नाहीं. माझे सर्व अपराध मला माफ कर. यापुढें मीं शत्रूचा पक्ष सोडून दिला असून, स्वराज्याच्या चळवळींत सामील झालों आहें. आपल्या कृपेमुळें ह्या पाप्याचा उद्धार होत आहे. आपल्यासारखे देव आणि शेवंती-सारख्या देवता पृथ्वीवर आहेत, म्हणूनच आमच्यासारख्या पतितांचा अधःपात व्हावयाचा टळतो.

**शिवाजी**—ठीक आहे सूर्याजी, आम्हीं तुला जीवदान दिलें आहे.

**शेवंती**—महाराज, या सापाच्या पिलाला जागच्याजागीं ठेचलें पाहिजे. ह्याला जर आपण जिवंत ठेवाल, तर हा आपल्या जातीवर गेल्याशिवाय

राहणार नाहीं; तेव्हां महाराजांची आज्ञा होईल तर या नरपशूला मी एकदम यमसदनाला पाठवतें. ( बाजूस पडलेला खंजीर उचलून घेते. )

**शिवाजी**—छे–छेः ! शेवंती, तूं चुकते आहेस. सूर्याजी आम्हांला शरण आला आहे. तेव्हां शरण आलेल्याला मरण देणें शिवाजीच्या शीलाला, त्याचप्रमाणें समशेरीला शोभणार नाहीं. तूं म्हणतेस त्याचप्रमाणें सूर्याजी जर आपल्या जातीवर गेला, तर आम्हीं सुरू केलेल्या स्वातंत्र्याच्या सर्पसत्रांत याच्यासारखे सारे विषारी सर्प जळून खाक होतील. ( मैनेकडे पाहून ) ही कोण या ठिकाणीं मूर्च्छित पडली आहे ?

**शेवंती**—ती सूर्याजीची बहीण मैना ! माझ्या संरक्षणासाठीं ती धांवून आली—

**सूर्याजी**—पण माझ्यासारख्या कामांध पशूनें तिला दूर लोटली व त्यामुळें तिच्या नाजुक हृदयाला धक्का बसून ती मूर्च्छित पडली. आपण आतां शेवंतीसह जा. मी तिला शुद्धीवर आणण्याची व्यवस्था करतों.

**शिवाजी**—शेवंती, चल पुढें. [ सूर्याजीशिवाय सर्व जातात.

**सूर्याजी**—धिक्कार असो माझ्या जन्माला ! शिवाजी आणि शेवंती दोघेंही माझ्या तावडींत सांपडलीं होतीं; पण ऐनवेळीं माझ्या शौर्यानें कच खाल्ली. शिवाजीच्या दैवी तेजानें मी दिपून जाऊन, माझी प्राणेश्वरी माझ्या डोळ्यांदेखत माझ्या शत्रूनें हिरावून नेलेली पाहण्याचा दुर्धर प्रसंग माझ्यावर आला ! पण एवढ्यानें स्वस्थ बसतां कामा नये. शेवंतीच्या प्रेमानें आणि शिवाजीच्या द्वेषानें मी अगदीं वेडा होऊन गेलों आहें; तेव्हां आतां मोंगल सुभेदाराची भेट घेऊन, त्याच्या फौजेच्या बळावर शिवाजीचा प्रथम नाश करतों, आणि नंतर पुन्हां शेवंतीची प्रेमयाचना करतों. मैना येथें मूर्च्छित पडली आहे, पण तिला इथेंच मरूं दे. तिला सावध करण्यांत काळ घालविण्यापेक्षां, मोंगल सुभेदाराची तांतडीनें भेट घेणेंच मला अधिक जरूर आहे. [ सूर्याजी जातो.

( पडदा पडतो. )

# अंक ३ रा

# प्रवेश १ ला

[ **स्थळ**—रामेश्वराचें घर. रामेश्वर, काशीबाई, करीम ऊर्फ केशवभट प्रवेश करितात. ]

**रामेश्वर**—वेताळ पूर्व ठिकाणावर यावा त्याप्रमाणें हा रामेश्वर पुन्हां पूर्वपदावर येऊन पोंचला ! सूर्यास्त झाला म्हणजे चंद्रोदय होतो, त्याप्रमाणें माझ्या मुखावरील दाढीचा अस्त होऊन डोक्यावरील शेंडीचा उदय झाला आहे. मध्यंतरी माझी शेंडी मला शेंडेनक्षत्रासारखी अशुभ वाटत होती; पण आतां तीच ध्रुवाच्या ताऱ्याप्रमाणें शुभदर्शनीय वाटत असून, माझ्या डोक्यावर अढळपद मिळवून बसली आहे. ‘ दुरून डोंगर साजरे ’ ह्या म्हणीचा अनुभव मला पुरेपूर आला. धर्मांतर केल्यानें आपल्याला सुख व सन्मान लाभेल, परकी लोक आपल्याला प्रेमानें वागवितील अशा आमच्या मनाला भुरळ पडून आम्हीं स्वधर्माचा त्याग करायला तयार होतों; पण अखेरीस त्या डोंगरावरचे कपाळमोक्ष करणारे पाषाण आणि रक्तबंबाळ करणारे कांटेकुटे पाहिले, म्हणजे सगळा भ्रम नाहींसा होऊन डोळे खाड्कन् उघडतात !

**केशवभट**—खरें म्हणतोस तूं. धर्मांतर करण्यापूर्वीं आम्हांला मोठमोठ्या थापा देतात, तुम्हांला नोकऱ्या देऊं, अधिकार देऊं; इतकेंच नव्हे तर बायकासुद्धां देऊं ! अशा दानशूरत्वाच्या लंब्याचवड्या बाता झोडतात. पण धर्मांतर करून सावज आपल्या जाळ्यांत पूर्णपणें अडकलें, म्हणजे मग एकदम देएंगे, दिलाएंगे सुरू होतें.

**रामेश्वर**—आणि मग बाटगा म्हणून स्वधर्मीयांत मान नाहीं व कम-अस्सल म्हणून विधर्मी लोक जवळ करीत नाहींत; अशी ‘ इदं च नास्ति, परं च न लभ्यते ’ स्थिति होऊन त्रिशंकूप्रमाणें मधेंच लोंबकळत राहावें लागतें.

**केशवभट**—अरे रामेश्वर, मींसुद्धां अशाच भुलथापांना भुलून एका फटाकड्या पोरीपायीं स्वधर्मावर पाणी सोडलें.

**रामेश्वर**--बहुधा त्या खुपसुरतबलेपायीं असेल, होय ना ?

**केशवभट**--नाहीं-नाहीं, दुसरीच एक मुमताज बेगम होती. तिच्या त्या भुरळ घालणाऱ्या मुलथापांनीं आणि नखरेल वागणुकीनें मी पागल बनलों आणि स्वधर्मावर पाणी सोडून मीं परधर्म स्वीकारला. पण अशी मौज झाली कीं, मीं धर्मावर पाणी सोडतांच तिनें माझ्यावर पाणी सोडलें व मला सोडून ती चालती झाली !

**रामेश्वर**--हो, कोणी झालें तरी तुपासाठीं उष्ट्याची आशा करणार ! पण तूप न मिळतां नुसत्या पत्रावळी चाटण्याची पाळी आली आणि त्या पत्रावळींचे टांकेच जिभेला बोंचून तोंडांतून रक्त बाहेर पडूं लागलें, तर त्याहून दुःख कोणतें असणार ?

**काशीबाई**--पण मी तुम्हांला प्रथमपासूनच सांगत नव्हतें का ? पण तुम्ही तर त्या वेळीं तिरशिंगराव बनलां होतांत !

**रामेश्वर**--लाडके, आतां कां मेलेल्याला मारतेस ? माझा पूर्वीचा सर्व मूर्ख-पणा-सर्व गाढवपणा-मी स्वतांच्या पदरांत आगाऊच बांधून टाकला आहे !

**काशीबाई**--म्हणे मी मुसलमान होणार ! मुसलमान होण्यानं जणुं काय मोक्ष मिळणार होता. आतां कळलंना परधर्मांतील सुख ? आतां नाहींना पुन्हां अंगांत भूत शिरायचं ? एकादां बाबामलंग पुन्हां नाहींना झपाटायचा ?

**केशवभट**--वहिनी, तुमच्यासारख्या पंचाक्षरी असल्यावर, एखादें भूतच काय पण माणूसही त्याच्या मानगुटीवर यापुढें बसणार नाहीं.

**रामेश्वर**--खरें म्हटलेंस करीम.

**केशवभट**--अरे, पण आतां मला करीम म्हणूं नकोस. मी केशवभट आहें.

**रामेश्वर**--हो खरेंच ! आतां तुला केशवभट म्हणूनच हांक मारली पाहिजे. आमच्या ह्या केशवभटाच्या युक्तीमुळें व आमच्या ह्या अर्धांगीच्या अढळ धर्मनिष्ठेमुळेंच मला पुन्हां माझा सर्वश्रेष्ठ धर्म लाभला; इतकेंच नव्हे तर माझी पत्नीही मला पुन्हां मिळाली व मी पुन्हा हिंदु बनलों. 'परधर्मो भयावहः' हें श्रीकृष्णाचें वचन अगदीं अक्षरशः खरें आहे. यासाठीं कितीही क्लेश झाले किंवा विपन्न स्थिति झाली, तरी माणसानें स्वधर्माचा त्याग कधींही करतां कामा नये, असा आपल्या शुद्धीकरणाच्या

प्रसंगीं श्रीसमर्थांनीं जो उपदेश केला, तो आपल्या हृदयावर आपण कोरून ठेवला पाहिजे.

**केशवभट**--बाकी रामेश्वर, तुझ्या धर्मान्तरास मीच कारण आहें. त्या दिवशीं मीं व फाजलनें जर तुला सोटेशाही गाजवून, शिवाजी म्हणून सुभेदारसाहेबांच्या पुढें उभा केला नसता, तर तुझ्यावर धर्मभ्रष्ट होण्याचा प्रसंग कां येता ?

**काशीबाई**--अहो भटजी, चुकतां आहांत तुम्ही. यांना मुसलमान बनण्याचें इतकं वेड लागलं होतं कीं, तुम्हीच जरी त्या दिवशीं तसा प्रकार केला नसतात, तरी हे एखादे दिवशीं एकादशणीला म्हणून बाहेर पडले असते आणि मशिदींत जाऊन बिस्मील्ला करून येते !

**रामेश्वर**--आतां त्या शिळ्या कढीला कां ऊत आणतेस ?

**केशवभट**--हें पहा रामेश्वर, तुझ्या बायकोमुळें तुझा अधःपात टळला. नाहींतर या काशीविश्वेश्वराची कबरच बांधावी लागली असती ! तुझी बायको खरोखरच साध्वी असून तिच्याच पुण्याईमुळें तुझा हा पुनर्जन्म झाला !

**रामेश्वर**--हें मीच काय, पण माझा प्रपितामहही कबूल करील. मी मुसलमान होऊन रोटीव्यवहाराला सुरुवात केली होती; पण एकदां का बेटीव्यवहार घडला असता, म्हणजे मग मात्र मी परधर्माच्या कर्दमांतील किडा बनून गेलों असतों; आणि मग माझा उद्धार होणें सर्वस्वी अशक्य होतें. पण माझ्या लाडकीनें पापाच्या गर्तेत पडलेल्या, ह्या आपल्या पतित पतीला वर काढून त्याला नवजीवन दिलें ! सारांश, आमच्या धर्माचें रक्षण आमच्या स्त्रियांनींच केलें आहे. पुरुष भ्रष्ट झाला तरी स्त्रिया भ्रष्ट होतां कामा नयेत. पुरुषांचें वांकडें पाऊल पडलें, तर स्त्रिया आपल्या सामर्थ्यानें तें सरळ करूं शकतात; पण स्त्रियांचें वांकडें पडलेलें पाऊल, विश्वाचें तिरपागडें केल्यावांचून राहणार नाहीं ! यासाठीं आमच्या स्त्रियांना नेहमीं विशुद्ध, सच्छील व धर्मपरायण राखण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

**केशवभट**--हो, पण रामेश्वर, आज प्रतापगडावर सर्व शुद्धिकृतांचें सहभोजन होणार असून, श्रीसमर्थही त्या ठिकाणीं उपस्थित रहाणार आहेत हें तुला माहीत आहे ना ? तुलाही आमंत्रण आलें असेल.

**रामेश्वर**—हो तर. अगदीं सहकुटुंब सहपरिवार तिथें जाऊन मी कार्य-सिद्धि करणार आहें. [ जातात.]

---

## प्रवेश २ रा

[ **स्थळ**—बंदीखाना. श्रृंखलाबद्ध **मालोजी** शिलाखंडावर विचारमग्न बसला आहे. ]

**मालोजी**—हर-हर ! दैवाची गति मोठी विचित्र आहे ! नशिबाचा निष्ठुर न्याय, मानवी मनानें मुकाट्यानें मानलाच पाहिजे. ज्या बाजीच्या वाड्यांत मी मोठ्या सन्मानानें येत असें, त्याच या मालोजीच्या कपाळीं, असलें लाजिरवाणें जिणें आणि अपमानाचें बोलणें सहन करण्याचें यावें ना ? याहून खडतर दैव तें कोणतें ! ज्या मालोजीला सांजसकाळ उंची खाद्यपेयें व सर्व प्रकारचा ऐषआराम मिळण्याविषयीं, स्वतः बाजी नेहमीं दक्षता बाळगी आणि ज्याला वाळ्याच्या पंख्यांनीं वारा घालून दासदासी सेवा-शुश्रूषा करीत, त्याला आज शिळेवर बसून शिळे तुकडे चघळावे लागत आहेत ! शिवाजीच्या मैत्रीमुळें माझ्याप्रमाणेंच आणखी कितीतरी दुर्दैवी जीवांना, बंदिखान्याच्या हालअपेष्टा भोगाव्या लागत असतील. मीं शिवाजीला सोडून पूर्वीप्रमाणें बादशाहाची नोकरी करण्यास तयार व्हावें, अशाविषयीं बाजीनें मला अनेकवार बजावलें, कठोर शासन करण्याची धमकी दिली; पण मीं त्याला निकराच्या निश्चयानें एकच सांगितलें कीं, तूं माझे प्राण खुशाल घे; पण शिवाजीच्या पायांवर वाहिलेली माझी समशेर, यापुढें स्वराज्याच्या शत्रूंचा संहार करण्याच्याच कामीं उपयोगी पडेल. त्यामुळें बाजीच्या अंगाचा वणवा पेटून, त्यानें आज सूर्यास्ताच्या सुमारास मांगांकडून माझा शिरच्छेद करण्याचा हुकूम सोडला आहे. लष्कऱ्याच्या ललाटीं धारातीर्थीं देह ठेवण्याचा मृत्युलेख सटवी लिहीत असते असें म्हणतात; पण मी इतका अभागी कीं, मला रणांत मरण न येतां शत्रूच्या कैदखान्यांत निर्दय व उलट्या काळजाच्या मांगाच्या नीच हातांनीं आज मृत्यु येणार ! शिव-शिव ! मरणांतही मानखंडना ! पण माझ्या रखूची व शेवंतीची काय स्थिति होईल ! सूर्याजीनें जर तिला भ्रष्ट

केली असेल, तर ती मानी पोर ह्या जगांत आपलें काळें तोंड दाखवायला जिवंतच राहणार नाहीं; परमेश्वरा ! माझ्या जिवाचें काय वाटेल तें होवो; पण महाराजांना यश देऊन माझ्या मायभूमीचें मुख उज्ज्वल कर, एवढीच तुझ्या पायांपाशीं या बंदिवानाची प्रार्थना आहे !

[ हातांत भोजनपात्र व पाण्याचा तांब्या घेऊन डोक्यावर काळा बुरखा पांघरलेली **शेवंती** प्रवेश करते. ]

**शेवंती**—नित्याप्रमाणं हें अन्नपाणी आणलं आहे.

**मालोजी**—तुझ्या धन्याला जाऊन कळीव कीं, मीं आजपासून अन्नत्याग केला आहे. तुझ्यासारख्या देशबुडव्या हलकटाच्या हातचें अन्न खाऊन मी माझा आत्मा भ्रष्ट करूं इच्छित नाही.

**शेवंती**—पण हें तुमच्या लाडक्या कन्येच्या हातचं असलं तरी तुम्ही ह्याचा अव्हेर करणार काय ?

**मालोजी**—काय ? माझ्या कन्येच्या हातचें ? म्हणजे ती त्या नीच सूर्याजीची सहधर्मचारिणी झाली कीं काय ? तसें असेल तर त्या चांडाळणीच्या हातच्या अन्नालाही मी स्पर्श करणार नाहीं. इतकेंच काय, पण तिचें मुखावलोकनही मी करणार नाहीं. ( शेवंती बुरखा काढते. ) कोण, माझी लाडकी शेवंती ? पण नको, तुझें दर्शन नको.

**शेवंती**—हां-हां ! बाबा, हें काय तुम्ही भलतंच बोलतां ? त्या दुष्टाशीं मी कधीं तरी लग्न लावीन का ? तुमच्या मनांत अशी शंका आली तरी कशी ? बरं, तें जाऊं द्या. आतां जलदी करा. ही तलवार घ्या आणि हा काळा बुरखा पांघरून तुम्ही इथून बाहेर पडा आणि बाहेर पूर्वेच्या बाजूला घोडा दिसेल त्याच्यावर मांड टाकून टाकोटांक राजगड गांठा. मुधोळवर छापा घालण्यास ही उत्कृष्ट संधि आहे, तेव्हां महाराजांनीं त्वरा करावी अशी महाराजांना जाऊन वर्दी द्या. चला. जलदी करा.

**मालोजी**—अग पण पोरी, माझ्या हातापायांतील या बेड्या प्रथम काढशील कीं नाहीं ? का मी बेड्या घालून वेड्यासारखा पळत सुटावें म्हणतेस ?

**शेवंती**—हो खरंच ! आनंदाच्या भरांत मला आठवणच राहिली नाहीं. आतां ह्या अलंकारांची मला आवश्यकता लागणारच आहे.

( बेड्या काढून त्यास मोकळा करते. )

**मालोजी**—पण बेटा, तूं इकडे कशी आलीस ? माझा रघू कुठें आहे ? आणि तूं येथें राहिलीस तर तुझ्यावर नसतें संकट ओढवायचें ! तुला संकटांत टाकून निघून जायला माझा जीव राजी होत नाहीं.

**शेवंती**—बाबा, माझ्याबद्दल तुम्ही मुळींच काळजी करूं नका. आतां उगाच वेळ गमावूं नका. प्रत्येक क्षण मोलाचा आहे. मला अजून इथं फार मोठी कामगिरी पार पाडायची आहे. तुम्ही अगोदर पाय उचला, मी तुमच्या पाठोपाठ आलेंच समजा. ( मालोजी जातो. ) ठीक, हा वेळपर्यंत सर्व गोष्टी कशा सुरळीत जुळल्या. आतां अखेरच्या कृतीनं या कामगिरी-वर कळस चढविला म्हणजे गंगेंत घोडें न्हालें असं वाटून माझ्या मनाचं समाधान होईल.

**पद**

**अपार यशाचा दुर्ग हातांत आला ।**
**शिवकार्या शुभ शकुन हा, आजि जहाला ॥ धृ० ॥**
**मज धैर्य आलें साधण्या देशकार्या ।**
**सकलखलविनाशा, शिवप्रभू आला शिवकार्या ॥ १ ॥**

मीं माझ्या हातांतील मुद्रिका सूर्याजीकडे पाठविली असून, त्याला या वेळीं इथें बोलावलं आहे. आतां तो इथें आला, म्हणजे बाबांच्या हातापायांतून काढलेल्या या लोहशृंखला, मी सूर्याजीच्या हातापायांत अडकवून त्याच्या पापाचं त्याला प्रायश्चित्त देणार आहें. ही आलीच स्वारी–( **सूर्याजी** येतो. )

**सूर्याजी**—( स्वगत ) शेवंतीच्या नाजुक करांगुलींतली ही हिऱ्याची आंगठी दृष्टीस पडतांच, मला अननुभूत आनंद होऊन माझें मन हर्षा-तिरेकानें उचंबळून आलें ! प्रथम बराच वेळ मला ही गोष्ट खरीच वाटेना. मी स्वप्नांत आहें कीं जागा आहें, ह्याचा माझ्या मनाला निर्णयच करतां येईना. जी माझा तिरस्कार करते, जिनें माझ्या प्रेमाला अनेकदां लाथाडलें आहे, जिला मीं पळवून नेऊन बलात्कारानें माझ्या प्रेमाला बळी देण्याचा घाट घातला, तीच शेवंती मला प्रणयमुद्रिका पाठवून एकान्तांत भेटायला बोलावील, ही पूर्वेचा सूर्य पश्चिमेस उगवण्याइतकी अशक्य असलेली गोष्ट, मला खरी कशी वाटावी ? पण अशा वेळीं तर्ककुतर्क लढवीत कालक्षेप करीत बसण्यापेक्षां प्रत्यक्षच प्रकार काय आहे तो पहावा म्हणून मी इकडे आलों.

ही पहा शेवंती माझी मार्गप्रतीक्षा करीत आहे. हिच्या प्रसन्न मुखावरून ही माझ्या मनांतील इच्छा पूर्ण करणार, अशी आशा करायला जागा आहे. हिचा पूर्वींचा हेका व तोरा मऊ पडलेला दिसतो. ( उघड ) शेवंती, ही तुझ्याच बोटांतील आंगठी तूंच माझ्याकडे पाठविलीस ना ?

**शेवंती**—होय, ती माझीच मुद्रिका ! स्वारीकडे मीं मुद्दामच ती पाठविली होती. इकडच्या भेटीसाठीं माझा जीव अगदीं व्याकुळ झाला, म्हणूनच मीं आपल्याला इकडे येण्याविषयीं मीं निरोप पाठविला. माझं भाग्य थोर म्हणून स्वारीला इकडे येऊन या गरीब दासीची भेट घेण्याची बुद्धि झाली. पण गडे, माझ्या पूर्वींच्या सर्व अपराधांची मला क्षमा केली आहे ना ? सांगा ना गडे ?

**सूर्याजी**—( स्वगत ) गडे, इकडे, स्वारी वगैरे शब्द हिच्या तोंडून बाहेर पडूं लागले; यावरूनच माझ्या मनाप्रमाणें वागायला ही राजी आहे हें स्पष्ट होत आहे. नाहीं तर पूर्वीं मांगा, नीचा, चांडाळा या शब्दांनीं आमची संभावना व्हावयाची ! पण आतां नूर पालटलेला दिसतो ! ( उघड ) तुझ्याकडून प्रणयमुद्रिका येईल हें प्रथम मला शक्यच वाटेना. तुझ्यासारखी नागीण कुसुमहारासारखी सुकोमल बनेल ही गोष्ट कांहीं केल्या माझ्या मनाला पटेचना.

**शेवंती**—आतां त्या मागील गोष्टी आठवून, माझ्या कोमल हृदयावर आघात करून, मला विव्हल कां बरें करायची ? मी मूर्ख म्हणूनच माझ्या हातून स्वारीची आजवर अवहेलना झाली ! स्वतःचं खरं सुख कशांत आहे हेंदेखील माझ्या अंधदृष्टीला दिसलं नाहीं; पण जाऊं द्या ती कर्म-कटकट ! आपण माझे प्राणालंकार आहांत. ह्या दासीला पदरांत घेऊन धन्य करावी, अशी माझ्या ह्या जीवितेश्वरापाशीं माझी प्रार्थना आहे.

**सूर्याजी**—शेवंती, तूं लौकरच शुद्धीवर आलीस हें फार बरें झालें. नाहीं तर तुझ्या हेकेखोरपणामुळें स्वतःचें जीवन तूं रुक्ष व कंटकमय करून घेतलें असतेंसच, शिवाय माझेंही आयुष्य कवडीमोल करून टाकलें असतेंस ! खरें ना शेवंती ?

**शेवंती**—इश्श ! माझं नांव काय घ्यायचं असं !

**सूर्याजी**—मग काय, तुझें नांव टाकून द्यावें म्हणतेस !

**शेवंती**--ही काय बाई भलतीच थट्टा ?

**सूर्याजी**--बरें लाडके, आतां तूं ह्या सूर्याजीची सहधर्मचारिणी व्हायला तयार आहेस ना ? तर मग मला आलिंगन देऊन--( आलिंगन देण्यास जातो पण ती मागें सरते.)

**शेवंती**--हां-हां, प्राणेश्वरा, हें काय असं अधीर व्हायचं ? आलिंगनाला अंमळ अवधी आहे. आधीं फूल आणि मग फळ, त्याप्रमाणं आधीं लग्न आणि नंतर आलिंगन ! महाराज, आपण मागें म्हटल्याप्रमाणं आपला, इथें या घटकेला गोरज मुहुर्तावर गांधर्वविवाह उरकून टाकावा अशी माझी इच्छा आहे. एकदां आपलं पतिपत्नीचं नातं धर्माज्ञेनं दृढ झालं, म्हणजे मग स्वारीची हवी ती इच्छा पूर्ण करणं धर्मपत्नी ह्या नात्यानं माझं कर्तव्यच आहे ! मग करायचा ना गांधर्व-विवाह ?

**सूर्याजी**--हो ! तुझ्याशीं गांधर्व-विवाह करायला मी केव्हांही तयार आहें; पण लग्नासारख्या मंगल कार्याला ही अमंगल जागा उचित नाहीं.

**शेवंती**--नाहीं, महाराज, नाहीं ! ही अमंगल जागा आहे असं आपण मानूं नका. प्रभु श्रीकृष्णाच्या जन्मामुळं बंदिखान्याच्या या भूमीला पवित्रपणा प्राप्त झालेला आहे !

**सूर्याजी**--आजपर्यंत आमच्या शत्रूंना चतुर्भुज करून आम्ही या ठिकाणीं ठेवीत आलों, त्याच जागीं आज निराळ्या अर्थानें स्वतः चतुर्भुज होण्याचा प्रसंग आला आहे !

**शेवंती**--शिवाय लग्न म्हणजे प्रेमबंधनच नव्हे का ?

**सूर्याजी**--ठीक आहे, तुझ्या मर्जीप्रमाणेंच होऊं द्या. तुझ्या प्रेमासाठीं मी अगदीं वेडा होऊन गेलों आहें; तेव्हां तूं म्हणशील त्याला माझी संमति आहे.

**शेवंती**--आतांच्या आपल्या बोलण्यानं मला किती आनंद झाला आहे ! आतां आपण माझी आणखी एक शेवटची इच्छा पूर्ण करावी म्हणजे झालं.

**सूर्याजी**--कोणती ती इच्छा ?

**शेवंती**--माझा एक पण आहे.

**सूर्याजी**--पण ? तो कसला बुवा ? शिवधनुष्य भंगण्याचा कीं मत्स्यभेद करण्याचा ? असला कांहीं पण मात्र आपल्याच्यानें जिंकवणार नाहीं !

**शेवंती**--असं घाबरून जाऊं नये गडे ! ते तसले भयंकर पण जिंकाण्याचं संकट मी स्वारीवर घालीनच कसं ? मला स्वारीच्या जिवाची काळजी नाहीं कीं काय ? माझा पण अगदीं साधा आहे आणि तो आपण सहज जिंकूं शकाल !

**सूर्याजी**—पण, तुझा पण तर कळूं दे अगोदर.

**शेवंती**—आजपर्यंत पुष्पमालांनीं किंवा रत्नमालांनीं आपल्या वल्लभाला अनेक रमणींनीं सुशोभित केलं आहे; पण माझी अशी इच्छा आहे कीं, ह्या लोहशृंखला आपल्या हातापायांत अडकवाव्या व नंतर आपण मला आलिंगनसुख द्यावें. माझी ही हौस आपण पुरवाल ना ?

**सूर्याजी** -- ही तुझी हौस फारच विचित्र आहे ! म्हणजे तूं मला आपला कैदी करूं पाहतेस !

**शेवंती**--बायकांना आपला पति आपल्या अगदीं मुठींत असावा असं नेहमींच वाटत असतं. आपल्या प्रेमाच्या बळावर पुरुषांना कैदी करून संसार सुखमय करावा असं स्त्रीजातीचं धोरण असतं. मग माझा पण आपण जिंकणार ना ? पुरवणार ना माझी हौस ? सांगाना गडे !

**सूर्याजी**--छट् ! आपण असल्या गोष्टीला मुळींच तयार नाहीं. मी दुसरा वाटेल तो धाडसाचा पण जिंकीन; तुझ्या प्रेमासाठीं मी हवें तें साहस करायला कचरणार नाहीं; पण लोहशृंखलांनीं तुझ्याशीं चतुर्भुज व्हायला मात्र मी तयार नाहीं, आणि शेवंती, हा काय तू भलताच हट्ट धरला आहेस ! तूं दुसरा एखादा पण लाव. तो जिंकला नाहीं तर नांवाचा सूर्याजीच होणार नाहीं !

**शेवंती**--हो ! एवढी साधी गोष्ट करावयाची तर एवढ्या त्रैलोक्यविजयी महापराक्रमी सूर्याजी घोरपड्यांच्या जिवाला घोर पडला आहे; मग मोठ्या साहसाच्या पणाच्या पोकळ बढाया कशाला माराव्या माणसानं ? माझ्यावर स्वारीचं मुळीं प्रेमच नाहीं, म्हणून तर माझी हौस पुरविण्याची अशी टाळाटाळ चालली आहे. वेडे शेवंती, कशाला उगीच इकडच्या प्रेमासाठीं तळमळतेस !

**सूर्याजी**--लाडके, तसें नव्हे ग ! तुझ्यावर माझें प्रेम नाहीं असें तूं कां बरें म्हणतेस ? तुझ्या प्रेमासाठीं हा सूर्याजी वेडा झाला आहे. ह्याला तुझ्या

प्रेमावांचून ह्या जगांत दुसरी कोणतीही गोष्ट रिझवूं शकत नाहीं ! तुझ्या प्रेमाभावीं माझ्या हातून रणांत पराक्रमही घडेनासा झाला आहे ! रात्रंदिवस तुझ्या प्राप्तीसाठीं हा सूर्याजी तळमळत असतांना तुझ्यावर माझें प्रेम नाहीं, असले माझ्या हृदयाला घरें पाडणारे शब्द तूं कां उच्चारतेस ?

**शेवंती**--मग माझा हट्ट पुरवायला स्वारीला जर मोठं संकट वाटतं तर मी असं म्हणूं नये तर काय म्हणावं ! सीतादेवीची साधी कंचुकीची हौस पुरविण्यासाठीं प्रभु रामचंद्रांनीं केवढं साहस केलं ! पण हातापायांत नुसत्या क्षणभर शृंखला घालून घ्यायला तुम्हांला मात्र प्राणसंकट वाटतं ! मग काय, नाहीं ना माझी हौस पुरवीत ? नाहीं ना ? तर मग, माझी ती मुद्रिका द्या पाहूं इकडे. ती चावून मी आपली मरूनच जातें कशी ! द्या ती.

**सूर्याजी**—( स्वगत ) शेवंतीनें प्रेमाच्या पेचांत आणून टाकलें आहे मला. लग्नाची बेडी स्वीकारण्यासाठीं सप्तपदी टाकायला पुरुषाचें मन कचरत नाहीं; पण ही बेडी धारण करण्याची वेळ आली तर एक पाऊलभर पुढें सरकायला पुरुषाचे पाय धजणार नाहींत. आतां काय बरें करावें ! नकार दिला तर चालून आलेली ही प्रेमाची लक्ष्मी लाथाडून दिल्याबद्दल जन्मभर दुःख करण्याची पाळी यायची. त्यापेक्षां शेवंतीच्या म्हणण्याप्रमाणें वागण्यानें माझी फार दिवसांची इच्छा व शेवंतीची हौस दोन्हीहि पूर्ण होतील. तेव्हां असेंच करावें हें बरें.

**शेवंती**--द्या म्हणतें ना ती माझी हिऱ्याची आंगठी !

**सूर्याजी**--आंगठींतील हिरकणी तूं चोखल्यावर मग मला या चालत्याबोलत्या हिरकणीचें चुंबनसुख कसें लाभणार ! ठीक आहे ! शेवंती, तुझी विचित्र हौस पुरवायला मी तयार आहें. तुझ्या प्रेमापुढें जगांतील सर्व गोष्टी तुच्छ आहेत. तुझ्या प्राप्तीसाठीं तूं म्हणशील ती गोष्ट करायला हा सूर्याजी तयार आहे. चल, घाल त्या शृंखला माझ्या हातापायांत आणि घे तुझी हौस पुरवून.

**शेवंती**--अहाहा ! आतां मला किती आनंद झाला म्हणून सांगूं ! पण अगोदर हातांत घालूं का पायांत अडकवूं बरं ?

**सूर्याजी**--प्राणलतिके, प्रेमांत अगोदर पाणिग्रहण आणि मग पायधरणी करावी लागत असते. पण लाडके, माझ्या एकट्याच्याच हातापायांत काय

म्हणून तूं ह्या बेड्या घालतेस ? तूं माझी अर्धांगी ना ? मग अर्धा वांटा तूं चल पाहूं. एक बेडी माझ्या हातांत व दुसरी तुझ्या व एक तुझ्या पायांत आणि दुसरी माझ्या अशी वांटणी केलेली चांगली. लग्नांत वरातीच्या वेळीं पति-पत्नीच्या पदराला गांठ मारून जशी मिरवणूक काढतात, तशी आपल्या दोघांच्या हातापायांत शृंखला अडकवून आपली वरात काढली र सारें मुधोळ आश्चर्यचकित होईल !

**शेवंती**—अगोदर मी आपल्याला या अलंकारांनीं सजवितें आणि मग मी दुसऱ्या अलंकारांनीं स्वतःची काया शृंगारतें ! ( त्याच्या हातापायांत बेड्या घालते. )

**सूर्याजी**—तुझ्यासारख्या सौंदर्यललनेच्या नाजुक हातांचा स्पर्श झाल्यामुळें ह्या कठीण लोहशृंखला बिसतंतूप्रमाणें कोमल व सुखावह झाल्या आहेत. वज्राला पारिजातक पुष्प बनविण्याचें सामर्थ्य स्त्रियांच्या नाजुक नेत्रकटाक्षांत व कोमल करस्पर्शांत असतें, असें म्हणतात तें अगदीं सत्य आहे. हां, झालों मी चतुर्भुज ! आतां आणखी काय समारंभ व्हायचा आहे ? प्राणप्रिये, मी तुझ्या आलिंगनासाठीं आणि चुंबनसुखासाठीं अगदीं उत्कंठित झालों आहें.

**शेवंती**—महाराज, थोडा धीर धरा; आपल्या सर्व इच्छा पूर्ण होतील, आतां आपल्याला औक्षण करण्यासाठीं मी पंचारती घेऊन येतें; तोंवर धारीनं स्वस्थ असावं. मी ही इतक्यांत आलेंच. [ जाते.

**सूर्याजी**—हिच्या प्रेमाची मोठी विचित्र तऱ्हा आहे ! शेवंतीनें आपल्या प्रेमाच्या पिंजऱ्यांत मला कोंडून ठेविलें आहे. हिनें माझ्यावर कांहींतरी जादू केली आहे खास ! मंत्रमुग्ध सर्प जसा गारुड्याच्या आज्ञेप्रमाणें वागतो त्याप्रमाणें मदनमंत्रांनीं भारून टाकलेल्या माझ्या मनाला शेवंतीच्या इच्छेप्रमाणें निमूटपणें वागावें लागत आहे. स्त्रियांची सत्ता जगांत निरंकुश चालते म्हणतात तें खोटें नाहीं. प्राचीन काळापासून स्त्रियांचें प्रभुत्व वाढत्या श्रेणीनें वाढत गेल्याचें पुराणांतील देवादिकांच्या गोष्टींवरून स्पष्ट होत आहे. विष्णूनें लक्ष्मीला पायाशीं ठेविली तर रामानें सीतेला अंगावर खेळविली, आणि शंकरानें तर गंगेला डोक्यावर नाचविली. पण पंचारती घेऊन माझी प्राणेश्वरी अजून कशी येत नाहीं ? ( हातांत नंग्या तरवारी

घेऊन दोन मांग येतात. ) अरे ! पण हें काय ? माझी प्राणेश्वरी शेवंती कुठें गेली ? आणि तिच्या ऐवजीं उफराट्या काळजाचे हे मांग इथें कसे आले ?

**जिवा**--अरे येश्या, धनिसायबांचा हुकूम झालाया कीं, दिस बुडायच्या आंतमंदी बंदींतील बेरडाचा शिरच्छेद करा म्हन्नशान् !

**येशा**--आम्हां मांगास्नी लोकांचे गळं कापणं आणि गवत कापनं अक्षी बराबर वाटतंया. मुंडी छाटण्याची ज्या मानसाला सजा व्हते, त्यास्नी व त्याच्या बायकापोरास्नी अक्षी रडूं येतया आनि वंगाळ वाटतंया; पन आमास्नी दिवाळी दसऱ्याचा आनंद वाटतुंया.

**जिवा**—अन् येश्या, समदं लोक जर लढाईंत अन् पटकी-महामारींत मरतं तर मग आमां मांगांचं पोट कसं भरलं असतं ! आमास्नी टांचा घासूनशानी मरन्याचाच वंगाळ वखुत आला असता, नव्ह का ?

**येशा**--पन जिवा, वाडुळ वखत झाला. आतां बिगी बिगी काम करून-शान् म्हाराजापास्नं मुंडासं आणि तोडा मिळविला पायजे.

**जिवा**--( समोर पाहून ) ह्योच तो मनुक्ष असावा जनू.

**येशा**--ल्येकाचा बघतोय पगा कसा बेरडावानी !

**सूर्याजी**--(स्वगत ) हा काय प्रकार आहे ! कांहींच उलगडा होत नाहीं !

**जिवा**--ये बेरडा, मरनाला तयार हो.

**सूर्याजी**--( स्वगत ) आं ! मला मारण्यासाठीं मांग कोणी पाठविले ? ( उघड ) काय रे, तुम्हांला कोणीं व कोणाला मारायला पाठविलें आहे ?

**जिवा**--बंदिखान्यांतल्या बेरडाला मारण्यासाठीं बाजी घोरपड्यांनीं आमास्नी पाठवलं हाय.

**सूर्याजी**—( स्वगत ) हां-हां, आत्तां समजलों. मालोजीचा शिरच्छेद करण्यासाठीं बाबांनीं या मारेकऱ्यांना इकडे पाठविलें असावें. ( उघड ) अरे मूर्खांनो ! शिरच्छेद माझा नाहीं करायचा, तर त्या मालोजीचा. तुम्ही माझ्या हातापायांतल्या बेड्या काढा म्हणजे मी तुम्हांला मालोजी दाखवतों. अरे, मी बाजीचा मुलगा सूर्याजी आहें.

**येशा**--अरे जिवा, ह्यो मनुक्ष मांगापरीस मांग हाय. आमास्नी फसवून पळून जाया बघतोया बेरड !

**जिवा**—रावसाब, तुम्ही घाबरूं नका. मी अशा सपाईनीं तुमची मान उडवीन कीं, परान गेल्यावर या पठ्याची तुमी तारिफच कराल.
**सूर्याजी**—अरे पण मांगांनो, वाटेल त्या माणसाची मान तोडतांना तुमच्या मनाला कांहींच कशी शरम वाटत नाहीं? तुम्हीं मनुष्यच आहांत ना?
**येशा**—नाई-नाई, आम्ही मांग आहोंत मांग. आम्ही दुसऱ्याची मान कापली नाई तर आम्हां मांगांचा मान कसा ऱ्हाईल?
**सूर्याजी**—( स्वगत ) आत्तां माझ्या डोळ्यापुढें सर्व लख्ख प्रकाश पडला! त्या शेवंतीचेंच हें सर्व कारस्थान आहे. मला शृंखलांनीं जखडून टाकून मांगांकडून ठार करण्याचा हा त्याच चांडाळणीचा चक्रव्यूह असला पाहिजे. काय करूं रे! मी मोकळा असतों तर या मांगांचा मुडदा पाडून त्या राक्षसणीच्या नरडीचा घोंट घेतला असता! कोमल कलिका म्हणून नागीण हातांत घेतली. सुधा समजून मीं जहाल विषाचा प्याला ओंठाला लाविला. ( उघड ) बाबांनो, मला जीवदान घा. माझ्यावर दया करा.
**जिवा**—मांगापाशीं दया ही चीज औषधालाबी मिळणार नाहीं रावसाब!
**सूर्याजी**—पण मला तुम्हीं आज विनाकारण ठार करीत आहांत. तुमचा धनी प्रत्यक्ष आपल्या पोराची मान कापण्याचा हुकूम करण्याइतका हैवान किंवा निर्दय खास नाहीं. मांगांनो, पाषाणाच्या हृदयांतून सोज्ज्वळ गंगा बाहेर पडते; मग तुमच्या हृदयांत दयेचा ओलावा उत्पन्न होणें कां बरें शक्य नाहीं? मीं आजपर्यंत एकाही देवाला पुजलें नाहीं; नेहमीं परमेश्वराच्या मूर्तींच्या डोक्यावर पाय देत आलेला हा सूर्याजी, आज मांगांच्या पायांवर डोकें ठेवण्यास तयार झाला आहे. मला प्राणांची भिक्षा घाला. ( पायांवर डोकें ठेवतो. )
**जिवा**—त्ये आमी कायबी ऐकणार नाय. तुला ठार केलाच पाहिजे. चल, मरनाला तयार हो. तूं आजपरेंत कोनत्याच देवाला भजलें नाहींस—
**येशा**—समद्याच देवांस्नी त्यानं भाजून खाल्लं हाय.
**जिवा**—तवा, घेवाची परार्थना करन्याचीबी तुला संधि मिळणार नाय. बाहेर सूर्यनारायण बुडायचा वखत आला, तवा आतां मान ताट-एकदम ताट-करूनशान उभा रहा.
**येशा**—म्हंजे एकाच फटक्यासरशी तुझी मुंडी छाटून टाकतों!

**सूर्याजी**—शिव–शिव ! काय हा दुर्धर प्रसंग माझ्यावर आला ! अखेरीस मांगांच्या हातून मला मरण यावें ना ? शेवंतीच्या मायावी प्रेमाला भुलून मी ह्या कालपाशांत आपण होऊन आपली मान अडकवून घेतली ! शेवंतीच्या गळ्यांत प्रेमपाश टाकण्यासाठीं मी आलों असतां, तिनेंच उलट माझ्या मानेला यमपाश अडकविला ! देवाघरचा न्याय अगदीं कांटेकोर असतो हेंच खरें. मीं देवाला कधीं नमस्कार केला नाहीं कीं, देशाची कधीं भक्ति केली नाहीं. माझें सर्व जीवन जुलूम, अन्याय व अत्याचार यांनीं दूषित झालेलें. शिवाजीसारख्या पुण्यपुरुषाचा मीं आजवर द्वेष केला. दुसऱ्यांच्या मुली माझ्या कामवासनेला बळी देण्यासाठीं मीं पळवून नेण्यास कमी केलें नाहीं. शेंकडों निरपराधी जिवांना मी मरणाच्या यातना भोगायला लावलें. त्या सर्व पापांचा परिपाक होऊन, परमेश्वरी संकेतानेंच आज मला ह्या पशुतुल्य मांगांकडून मरण येत आहे. जसें करावें तसें भरावें ! आणि जसें द्यावें तसें घ्यावें, हा परमेश्वरी कायदा कोणालाच भंग करितां येणार नाहीं. परमेश्वरा, माझ्या सर्व पापांची मला क्षमा कर आणि पुढील जन्मीं माझ्या मायभूमीच्या स्वातंत्र्यासाठीं झटणाऱ्या श्रीशिवाजीच्या पोटीं मला जन्माला घालून माझा उद्धार कर, एवढीच मरणकाळची या दासाची तुझ्या पायांपाशीं प्रार्थना आहे. ( गुडघे टेकून प्रार्थना करितो. त्याला ओढीत आंतल्या बाजूला नेतात. )

**जिवा**—हां येशा, बघतोस काय ? उडव !

**येशा**—जिवा, मानेच्या बाजूनें मी अन् गळ्याच्या बाजूनें तूं, एकदम घाव घालूं या. ( ते तरवारीचे घाव घालतात. सूर्याजीचें शीर तुटून पडतें, **बाजी घोरपडे** येतो. )

**बाजी घोरपडे**—मालोजीचा शिरच्छेद झाला कीं नाहीं ? कुठें आहे त्याचें शीर ?

( सूर्याजीचें शीर घेऊन मांग पुढें येतात. )

**जिवा**—( सूर्याजीचें शीर दाखवून ) हें पहा धनीसाब !

**बाजी घोरपडे**—( पाहून दचकतो. ) अरे, हें काय मी पहात आहें ! तोंडवळा तर माझ्या सूर्याजीसारखा दिसतो आहे. मांगांनो, तुम्ही घात केलात रे घात केलात ! शत्रु म्हणून तुम्हीं माझ्याच मुलाचें मुंडकें

तोडलेंत ! ( मांग जातात. ) माझा एकच एक आशातंतू तोडून टाकलात ! पण ही सगळी गफलत झाली कशी ? मला वाटतें ही सारी त्या शिवाजीचीच दगाबाजी असावी. कांहीं तरी कारस्थान करून मालोजीला सोडवून नेऊन त्यानें सूर्याजीचा गळा या संकटांत अडकविला व त्यामुळें माझ्यावर पुत्रशोकाचा हा दुःसह प्रसंग आला ! एकूण 'चिंती परा तें येई घरा' हा सृष्टिनियम सत्य आहे. पण नाहीं. मी मुळुंमुळूं रडत बसणार नाहीं. ह्या पराक्रमी बाजीला असें रडत बसणें शोभत नाहीं. तरवारीच्या तीक्ष्ण अंजनानें शत्रूला आणि त्याच्या बायकापोरांना मी आजपर्यंत रडवीत आलों आहें. बस्स, तें कांहीं नाहीं. ह्या सगळ्या अनर्थाचा मूळ सूत्रधार व आदिलशाहीचा वैरी शिवाजी भोंसला, त्यालाच ह्या जगांतून नाहींसा केला पाहिजे !

[ **शिवाजी** प्रवेश करतो. ]

**शिवाजी**—शिवाजीला जगांतून नाहींसा करण्यापूर्वीं तूंच परलोकच्या प्रयाणाची तयारी कर.

**बाजी घोरपडे**—कोण ? आमचा हाडवैरी–शिवाजी भोंसला ! अहाहा ! चांगला सांपडला माझ्या तावडींत ! सूर्याजीच्या रक्तानें रंगलेल्या ह्याच रंगभूमीवर तुझ्याच रक्ताचा सडा पडला पाहिजे. शिपाई हो ! माझे सारे शिलेदार कोठें गेले ? साऱ्या फौजेला हुशार राहण्याची आज्ञा करा.

**शिवाजी**—तुझ्या साऱ्या फौजेला पाणी पाजून व मुधोळला मसणवटी बनवून, आतां तुझ्याच समाचारास आलों आहें. आतां तुझ्या साहाय्याला कोण येणार ?

**बाजी घोरपडे**—एः ! दुसरा कोणी जरी माझ्या साहाय्याला धांवला नाहीं तरी माझा पराक्रम मला सोडून जाणार नाहीं ना ? ह्या बाजीच्या हृदयांतील धैर्य आणि मनगटांतील बळ कोणाला हरण करतां येईल ? मोऱ्यावर मात केलीस म्हणून ह्या बाजीवर प्यादी करूं शकशील असें समजूं नकोस. तुझ्या बापाला ज्यानें कैदखाना दाखविला, त्या ह्या बाजी घोरपड्याला तुझ्यासारख्या पोराचें काय भय आहे ? माझा पराक्रम तूं आजपर्यंत नुसता ऐकला असशील, पण आज तो प्रत्यक्ष तुझ्या अनुभवाला आणून देतों.

**शिवाजी**—हंः, तुझा पराक्रम मलाच काय, पण सर्व महाराष्ट्राला मश्हूर झालेला आहे. माझी तसबीर पायांखालीं तुडविणारें तुझें शौर्य, मुधोळलाच नव्हे तर अखिल दख्खनला दखल झालें आहे. पण बाजी, तसबीर तुडविणें हें सावलीला झोडपण्यासारखें बालिशपणाचें कृत्य आहे, ही गोष्ट तुझ्यासारख्या वृद्धाला कळूं नये, यावरूनच तुझी बुद्धी भ्रष्ट झाली आहे हें उघड होत आहे; आणि माणसाची केवळ तसबीर तुडविण्यानें जर माणसें तुडविलीं जातीं, तर चक्रवर्ति सम्राट् सिंहासनासकट, पांच वर्षांच्या पोराच्या पायाखालींही चिरडून ठार झाले असते.

**बाजी घोरपडे**—पातशहाची सेवा-चाकरी प्रामाणिकपणानें करून आपला लौकिक वाढवायचा सोडून, तुला स्वातंत्र्याचे दिवटे खेळ खेळण्याची दुर्बुद्धि आठवली, यावरूनच तुझा मरणकाळ जवळ आला असें मानलें पाहिजे. मुलुखांतील मूर्ख लोकांनीं तुझ्यासारख्या पाषाणाला परमेश्वर बनविला आणि पालखी अंबारींतून तुला मिरविला, तरी अखेरीस तुझ्या कपाळीं उलटी अंबारीच येणार हें माझें वचन कालत्रयींही खोटें होणार नाहीं.

**शिवाजी**—बाजी, बेफाम बरळून तुझ्या पांढऱ्या केंसांची इज्जत आपल्या हातानं कां गमावतोस ? जुलमी सत्तेच्या सिंहासनापुढें, डोकें आपटून आपटून कपाळ फुटण्याची पाळी आली, तरीसुद्धां त्याच सत्तेचा तूं उदोउदो करणार ! अन्यायाचे आसूड पाठीवर बसल्यामुळें, रयतेच्या पाठीचीं सालडीं न् सालडीं निघालीं तरी त्याच अन्यायी व अधर्मी सत्तेच्या आंसाला आधार देण्याचा अविचार तूं करणार ? आपल्याच आयाबहिणींची यवनांकडून विटंबना होत असतांना राजनिष्ठेचा आव राखण्यासाठीं तूं अत्याचाराचें समर्थन करणार ? बाजी, शुद्धीवर ये. आपल्या कर्तव्याला ओळख; आपली माणुसकी राजसेवेला विकून जगाकडून छीःथूः करून घेऊं नकोस. त्यापेक्षां आमच्या स्वातंत्र्याच्या व स्वधर्माच्या चळवळींत सामील हो व आपल्या पराक्रमाचें चीज कर. स्वायत्ततेचें अमृत सोडून परवशतेची सुरा पिण्यासाठीं निष्कारण कां धडपडतोस ? मग काय, माझा तुला सीधा सवाल आहे. आमच्या झेंड्याखालीं येणार कीं आत्मनाश करणार !

**बाजी घोरपडे**—हा बाजी खाल्ल्या मिठाला जागणारा जातिवंत मराठा आहे. पातशहाच्या सेवेंत काळ्याचे पांढरे झालेले हे केंस, तुझ्या पक्षाचा

अंगीकार करून काळे करून घ्यावे म्हणतोस? पण ही गोष्ट केव्हांही घडणार नाहीं. पातशहाच्या सिंहासनासमोर मुजऱ्यासाठीं मान वांकवितां वांकवितां ती तुटून पडली तरी बेहेत्तर, पण तुझ्या राजद्रोही चळवळीस मी कधींही मान तुकविणार नाहीं. माझ्या म्हतारपणामुळें तुला माझी कींव येते असा कांगावा जरी तूं केलास, तरी तूं पक्कें ध्यानांत ठेव कीं, सिंह म्हातारा झाला तरी तो कोल्हयाला सहज गिळूं शकतो. ( तलवार उपसतो. )

**शिवाजी**—ठीक आहे. तर मग या वृद्ध सिंहाची शिकार मला केलीच पाहिजे. तुझ्यासारख्या अस्तनींतल्या निखाऱ्यांना तरवारीच्या पाण्यानें विझवून त्यांची राखरांगोळीच केली पाहिजे. असल्या देशबुडव्या नराधमांची स्वातंत्र्ययज्ञांत आहुति पडणेंच न्याय्य असतें. स्वराज्याच्या शत्रूंचा—मग ते स्वकीय असोत वा परकीय असोत—कांहीं एक दयामाया न धरतां निःपात करावा अशी मुळीं नीतीच आहे. बाजी, तुझ्या देशद्रोही कृत्यांच्या पापाबद्दल हा घे माझ्या भवानी समशेरीचा प्रसाद. ( दोघे युद्ध करतात, बाजीची तरवार गळून पडते व लगेच शिवाजीच्या तरवारीच्या घावानें बाजी मरून पडतो. ) आज बाजीच्या वधामुळें मी पितृऋणांतून मुक्त झालों आहें! ह्या वार्तेनें बाबांच्या मनाला आनंद झाल्यावांचून खाचित राहणार नाहीं!

[ **मैनावती, मालोजी** व **शेवंती** प्रवेश करतात. ]

**मालोजी**—महाराजांचा जयजयकार असो!

**शिवाजी**—मैनाबाई, तुमच्या पित्याच्या मृत्यूबद्दल तुम्ही आपल्या मनाला वाईट वाटून घेऊं नका. तुमची राष्ट्रभक्ति आणि धर्मसेवा आम्हांला माहीत नाहीं असें नाहीं; किंबहुना आमच्या राष्ट्रकार्याला देशांतील तेजस्वी आर्यपुत्रांइतकीच तुम्हां आर्यकन्यांची मदत झाली आहे.

**मालोजी**—महाराज, माझी ही जिवाची जहागीर, हें प्राणांचें पुष्प—

**शिवाजी**—क्षमा करा, शेवंती माझी धर्मभगिनी आहे! तेव्हां आपली विनंती मला मान्य करतां येत नाहीं. पण आमच्या बहिणीला मनासारखा नवरा आम्ही अवश्य पाहून देऊं; तुम्ही मुळींच काळजी करूं नका, असो, मालोजीराव, बाजी घोरपड्याचा आम्हीं वध केला, तो केवळ

बाबांचा त्यानें अपमान केला होता त्याचा सूड उगविण्यासाठीं नव्हे; तर आदिलशाहीचा एक आधारस्तंभ नाहींसा करून, शत्रूला शून्यतेज व बलहीन करावें असें आमचें धोरण होतें. आप्तस्वकीयांशीं मी कसा युद्ध करूं? अशाप्रकारचा दौर्बल्यदर्शक व क्षात्रधर्मास अनुचित असा प्रश्न पार्थाच्या मनांत उत्पन्न झाला असतां, भगवान् श्रीकृष्णानें ज्या संदेशानें त्याचा व्यामोह दूर करून त्याला स्वकर्तव्याची जाणीव करून दिली तोच 'शिवसंदेश' प्रत्येक राष्ट्रपुरुषाला रत्नदीपाप्रमाणें मार्गदर्शक होत असतो. स्वराज्याचें व स्वधर्माचें कार्य हें परमेश्वरी कार्य असल्यामुळें. त्याच्या आड येणारा व त्यास विरोध करणारा स्वकीय व आप्त-इष्ट कां असेना, त्याला नष्ट करून पृथ्वीपालनाचें कार्य निष्काम बुद्धीनें करावें हेंच 'राष्ट्रसूत्रधारा'ला इष्ट असतें व म्हणूनच मोऱ्या-घोरपड्यांसारख्या शूर स्वबांधवांची आहुती स्वातंत्र्याच्या यज्ञांत टाकणें आम्हांला भाग पडलें.

मैना-शेवंती पद

होवो विजयी शिवराय, देवा ॥ धृ० ॥
मर्दमराठा जमवुनि सगळा । सिद्ध रणा केला ॥ १ ॥
परदास्याची कठिण शृंखला । तोडविण्या सजला ॥ २ ॥
भारतजननी वत्सलभावें । देई शुभाशिर्वाद ॥ ३ ॥

('शिवाजीमहाराज की जय' असा सर्वजण घोष करतात.)

– पडदा पडतो –

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥